# नवभारत

सप्टेंबर २००९





अश्मयुगीन

# निअँडरताल



मानवाचा पूर्वज ?

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## पोथी, निळावंती

फुलं माझ्याशी हितगूज करायची
फुलपाखरंही मन मोकळं करायची
आसपास दिसणारी प्रत्येक खार
झाडांवरच्या मौजमजा सांगून जायची
बागेतलं मुंगूस लांबून बघायचं
ओळख वाढल्यावरच दोस्ती करायच
जमिनीवर उतरून यायचा भारद्वाज
मला पिसारा दाखवायला
शेवग्यावर उलटा लटकून पोपट
हाक मारायचा खेळायला
तारेही खूप काही बोलायचे
निःशब्द रात्री जागवून जायचे

तेव्हाच चमकता काजवाही यायचा
रातकिडयांच्या किरकिरीला खूप हसायचा.
निसर्गाच्या भाषेची ही निळावंती पोथी,
एकेकाळी मला फार छान माहीत होती.
यातलं कुणीच, कधीच, काहीच
माझ्याशी आजकाल बोलत का नाही
का ते सगळे बोलत असतात.
अन् मलाच फक्त कळत नाही.

---

## गेली कुठे?

कधी तरी झऱ्यासमोर
किंवा एका ताऱ्यासमोर
स्पर्शाने थरथरत्या हाती
घामामधला गंधित मोती
कष्टाच्या घासाची चव
तान्ह्या हुंकाराचा रव
याने केले मला अबोल
या भाषेचे कसले मोल

असली भाषा गेली कुठे
बोलून ती घालवली कुठे?

शेल सिल्व्हर्टन (१९३०-१९९९) नावाजलेल्या अमेरिकन कलावंताने लहान मुलांसाठी गाणी व कविता लिहिल्या व त्या अतिशय लोकप्रिय झाल्या.

त्यातील काही कवितांवर आधारीत, संतोष शिंत्रे आणि जयंत गाडगीळ यांच्या 'शेलक्या कविता' या संग्रहातील काही कविता आम्ही दरमहा प्रसिद्ध करणार आहोत. या अंकात दोन कविता दिल्या आहेत.

- संपादक

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६२। अंक १२। सप्टेंबर २००९
भाद्रपद/आश्विन शके १९३१
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २००९

## अनुक्रमणिका


**मराठी संतकविता आणि परिवर्तनाच्या जाणिवा** ३

❖ श्री. रत्नाकर मंचरकर

**ब्रिक - नवजागतिक व्यवस्थेची नांदी ठरू शकेल?** १३

❖ प्रा. विठ्ठल दहिफळे

**बदलते राजकीय वास्तव आणि ग्रामीण कादंबरी** १९

❖ प्रा. डॉ. अरुण शिंदे

**काल, आज आणि उद्या -** ३०

**निॲंडरतालची स्थिती**

❖ साक्षी

**परीक्षण लेख : विधिमंडळे आणि न्यायसंस्था :** ३५

**संघर्षाचे सहजीवन**

❖ प्रा. सीताराम रायकर

**साभार पोच**

# मराठी संतकविता आणि परिवर्तनाच्या जाणिवा

श्री. रत्नाकर बापूराव मंचरकर

**०१. मराठी संतकविता –**

भारतीय साहित्य, समाज आणि संस्कृती यांच्या जडणघडणीत धर्मधारणांचा वाटा मोठा राहिलेला आहे. आचार्य विनोबा भावे लिहितात, "प्राचीन काळी वैदिक, श्रमण आणि बौद्ध विचारांच्या लाटा एकामागून एक उत्तर भारतातून दक्षिण भारतात वाहत गेल्या. त्यांच्या वेगाने राज्ये मोडकळली आणि रचली, समाज पालटले, जाती उसळल्या आणि मिसळल्या. नव्या भाषा आणि नवे रीतिरिवाज उदयास आले. त्यानंतर मध्ययुगात विचारांच्या अशाच लाटा दक्षिणेतून उत्तरेकडे वाहत गेल्या. या साऱ्या तत्त्वज्ञानाच्या आणि उपासनेच्या होत्या. शंकर, रामानुज, मध्व, ज्ञानदेव, वल्लभ असे पाच आचार्य एकामागून एक अनुक्रमे केरळ, तामीळनाडू, कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र या भिन्न भाषा बोलणाऱ्या प्रदेशांत अवतरले. त्यांपैकी ज्ञानदेवाने आपले सर्व साहित्य आपल्या प्रांताच्या लोकभाषेत रचले."[०१]

भक्तिआंदोलन आणि त्यातून अवतरलेले भक्तिसाहित्य हा मध्ययुगात सर्वांत अधिक पसरलेला आणि टिकलेला धागा आहे. दक्षिणेतील तामीळनाडूत सुरू झालेली भक्तिचळवळ उत्तरेकडे क्रमाक्रमाने पसरत गेली. उत्तरेतला प्राचीन भागवतधर्म आणि दक्षिणेतील आलवार साधूंचा गूढ आनंदवाद यांचा मिलाफ तिने घडविला. तिरुवल्लरचे तामीळ कुरल, महाराष्ट्रातील ज्ञानोबापासून तुकोबापर्यंतच्या संतांची मराठी भक्तिकविता, कबीर मीरा–सूरदासांची हिंदी कविता, तुलसीदासांचे 'रामचरितमानस', शंकरदेवांचे आसामी भागवत, चैतन्य महाप्रभूंचे बंगाली 'शिक्षाष्टक' असा हा धागा भारतभर गुंफलेला दिसतो.

मध्ययुगीन भारतीय संतकविता परधर्मी आक्रमकांच्या अटळ छायेत लिहिली गेलेली कविता आहे. इसवी सनाच्या तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंतच्या पाचशे वर्षांचा काळ या कवितेने व्यापलेला आहे. मध्ययुगीन भारतीय संतकविता प्रामुख्याने प्रादेशिक कविता होती. त्यामुळे ती लोकभाषेतून बोलकी झाली आणि लोकहृदयाशी संवाद करू शकली. मध्ययुगीन भारतीय कवितेचा भूगोल या प्रादेशिक कवितेने दहा दिशांनी विस्तारत नेला. पंजाबपासून केरळपर्यंत आणि राजस्थानपासून बंगालपर्यंत या कवितेचा व्यापविस्तार आहे.

मराठी संतकविता या भूगोलाच्या मध्यभागी आहे. त्यामुळे तिच्यात उत्तर आणि दक्षिण भारतीय काव्यपरंपरांचा संगम झालेला आहे.

मराठी संतकविता धर्मसंप्रदायांशी संबंधित आहे. नाथ, महानुभाव, वारकरी, दत्त, गाणपत्य, नागेश, आनंद, माधव, रामानुज, हरिनारायण आणि समर्थ या संप्रदायातील संतांनी ही कविता लिहिलेली आहे. त्याचप्रमाणे बौद्ध, जैन, सूफी, आणि ख्रिश्चन या परंपरेतील संतांनीही मराठी कविता लिहिलेली आहे. त्यांची कविता त्यांच्या साधनाप्रणालीतून उगम पावलेली आणि सांप्रदायिक संस्कारांनी रंगलेली आहे.

शैवांच्या काव्यशास्त्रातून मराठी संतकवितेत शांतरसपूर्ण तत्त्वग्रंथांची परंपरा जन्माला येते. या तत्त्वकवितेतील रसमयतेला परतत्त्वाचे अधिष्ठान आहे. ज्ञानदेवांची ज्ञानदेवी ही या परंपरेतील आदिकविता आहे.

शैवांनी शांत रसाला श्रेष्ठ मानले तर वैष्णवांनी भक्ती या रसाला श्रेष्ठ मानले. त्यातून नामदेवादी संतांची भक्तिकविता अभंगांच्या रूपाने खळाळत राहते.

महानुभावांनीही भक्ती हाच श्रेष्ठ रस मानला. चक्रधरांना कृष्णावतार मानून त्यांनी स्वयंवरकाव्यांचा नवा बंध कोरला. दर्शनी शृंगारप्रधान आणि अंतरी भक्तिप्रधान अशी कथाकविता इतरही सांप्रदायिक संतांनी नंतर लिहिली.

तत्त्वकविता, भक्तिकविता आणि कथाकविता ही संतकवितेची तीन ठळक रूपे आहेत.

संतकविता लोकभाषेतून आणि लोकछंदातून

अवतरली. ती सादरकर्त्याच्या हुन्नरीने तिची खुमारी वाढते अशी मुख्यतः श्राव्य व क्वचित दृश्य कविता आहे. शेतारानात राबणाऱ्या आणि बलुतेदारी करणाऱ्या अडाणी कष्टकऱ्यांनी ही कविता साडेसातशे वर्षे आपल्या जिभेवर घोळत ठेवलेली कविता आहे.

**०२. मराठी संतकवितेचे पर्यावरण**

येथे परिवर्तनवादी जाणिवांच्या कसोटीवर संत कवितेची तपासणी करावयाची आहे. त्यासाठी आधी काही बाबी स्पष्ट करावयास पाहिजेत. संतसाहित्य ही परंपरागत समाजाची निर्मिती आहे, हे लक्षात घ्यावयास हवे.

कोणत्याही मूलभूत परिवर्तनाची शक्यता मध्ययुगीन महाराष्ट्रात नव्हती. येथला माणूस अनेक बंधनांनी बांधलेला होता. समाज जातीजातीत विभागलेला होता. जातीचा संबंध जन्माशी होता. त्यामुळे त्यात नंतर कोणताही बदल करणे व्यक्तीला शक्य नव्हते. जन्माने जात ठरत होती, जातीने व्यवसाय ठरत होता. व्यवसायाने आर्थिक उत्पन्न ठरत होते. त्यावरच व्यक्तीची सामाजिक प्रतिष्ठा अवलंबून होती. अशा प्रकाराने जन्म-जात-व्यवसाय-आर्थिक उत्पन्न-सामाजिक प्रतिष्ठा यांची एक साखळी होती आणि तिने सामान्य माणूस बांधलेला होता. त्याच्या कर्तृत्वाचा, इच्छेचा किंवा गुणावगुणांचा विचार न करता एका स्थिर, निश्चित अशा सामाजिक चौकटीत त्याचे जीवन बांधलेले होते.

आर्थिक क्षेत्रात वतनदार आणि रयत अशी विभागणी होती. वतने पिढ्यान्‌पिढ्या आणि वंशपरंपरागत होती. शेती हाच उपजीविकेचा मुख्य आधार होता. अस्मानी-सुलतानीच्या फेऱ्यात सापडणाऱ्या शेतीत शेतकऱ्याच्या कष्टाला योग्य किंमत मिळेल, त्याचे चीज होईल याची शाश्वती नव्हती. आर्थिक विषमता मोठ्या प्रमाणावर होती.

राजसत्ताही वंशपरंपरागत आणि अनियंत्रित होती. ती बऱ्याच वेळा स्वार्थपरायणतेकडे आणि जुलूम-जबरदस्तीकडे झुकणारी असे.

ह्या तीनही क्षेत्रांवर धर्मसंस्थेचे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष नियंत्रण होते. देव, दैव, काळ, नियती या तत्त्वांनी माणसाचे जीवन बांधलेले होते. कुलधर्म, जातिधर्म, पंचायत, ग्रामसंस्था अशा निरनिराळ्या धाग्यांनी व्यक्तीचे जीवन जखडलेले होते.

सामाजिक क्षेत्रात विषमतामूलक जातिव्यवस्था, आर्थिक क्षेत्रात वतनदारी, राजकीय क्षेत्रात अनियंत्रित राजेशाही आणि ह्या सर्वांवर परिवर्तन घडल्याशिवाय या चिरेबंदी व्यवस्थेत बदल घडणे शक्य नव्हते आणि तशा भौतिक परिवर्तनाची कोणतीही शक्यता नव्हती.

"ठेविले अनंते तैसेचि राहावे।
चित्ती असो द्यावे समाधान।।"

हे श्रीतुकारामांचे उद्‌गार निष्क्रिय दैववादाचे उद्‌गार नव्हते, तर ह्या अटळ वास्तवाचा स्वीकार करणारे समंजस व सोशिक उद्‌गार होते.

ह्या स्थितिशील आणि साचेबंद जीवनप्रवाहाला वाहते करण्यासाठी समाजाचे आंतरजीवन समृद्ध करण्याचा मार्गच मराठी संतांना चोखाळावा लागला. धर्मामुळे व्यक्तीचे जीवन बांधलेले होते हे खरे असले तरी त्या काळोख्या जिण्याचा प्रकाशमय झरोका धर्म हाच होता, हेही लक्षात घेतले पाहिजे. हिंदुधर्माच्या विशिष्ट अशा लवचिक व समावेशक स्वरूपामुळे धर्माच्या क्षेत्रात अंतर्गत स्वातंत्र्याला अवसर होता. ईश्वर मानावा की नाही येथपासून द्रोण पालथा ठेवावा की उलथा अशा प्रश्नांपर्यंत चर्चा करण्याचे, स्वतःचे मत बाळगण्याचे स्वातंत्र्य धार्मिक क्षेत्रात होते. अशा स्वतंत्र वातावरणातच नवे विचार जन्म घेतात. धर्म हेच मध्ययुगीन जीवनाचे बंधन होते आणि त्याला मुक्त करण्याचे सामर्थ्यही धर्मातच होते. त्यामुळेच मराठी संतकविता धर्मप्रधान बनली.

भारतीय परंपरेत धर्म ही व्यापक संकल्पना आहे. व्यक्तीचा समाजाशी आणि विश्वाशी असलेला संबंध हा धर्माचा विषय आहे. वेदाच्या आज्ञांचे परिपालन म्हणजे धर्म अशी मीमांसकांची कल्पना होती; पण मराठी संतांनी ती स्वीकारलेली दिसत नाही. ज्यापासून अभ्युदय आणि निःश्रेयस यांची सिद्धी होते तो धर्म अशी वैशेषिक सूत्रकार कणादमहर्षी धर्माची व्याख्या करतात. व्यक्ती आणि समाज यांचे नियमन करतो तो धर्म अशी स्मृतिकारांची कल्पना होती. समाजातील सगळ्या व्यक्तींना आपापला पुरुषार्थ संपादन करता येईल अशी लोकरहाटी म्हणजे धर्म. लोकयात्रेची समाजधारणेची तत्त्वे किंवा नियम

अनुक्रमणिका

म्हणजे धर्म.

उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, षड्दर्शने, श्रीमद्भगवद्गीता आणि श्रीमद्भागवत यांचा बौद्धिक आणि आध्यात्मिक वारसा मराठी संतांनी आत्मसात केला. पंढरपूरच्या परिसरातील प्राथमिक अवस्थेत असलेल्या धर्मजीवनाचा त्यांनी या प्राचीन संस्कृतीशी सांधा जुळविला. ज्ञानेश्वरी, नामेदव-गाथा, एकनाथी भागवत आणि तुकोबाचे अभंग यांतून परंपरेने चालत आलेल्या भागवतधर्माला मराठी संतांनी एक नवे रूप दिले.

भागवतधर्मीय संतांची धर्मसाधना आणि काव्यसाधना एकरूपच होती. आपल्या जगण्याचे सार, त्याचे उद्दिष्ट, त्यातील प्रेयस आणि श्रेयस यांचा शोध त्यांनी आपल्या वाङ्मयातून घेतला. मानवी अस्तित्वाचा अर्थ शोधताना प्रचलित धर्ममतांचा त्यांनी आदरपूर्वक स्वीकार केला. पण त्याच वेळी ती स्वतःच्या अनुभवाच्या कसोटीवर घासूनपुसून पाहण्याचा प्रयत्नही त्यांनी सातत्याने केला. त्यामुळे त्यांचे साहित्य कालप्रेरणेशी जोडले गेले. आपल्या काळातल्या जीवनाच्या सगळ्या अंतर्बाह्य प्रेरणांशी संबंधित राहून संतांनी सार्वकालिक तत्त्वांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. त्यांचे वाङ्मय हा जसा आत्मशोध होता तसा जीवनशोधही होता. तो जसा आत्मसंवाद होता तसा लोकसंवाद होता. प्रचलित धर्ममतांना सामावून घेऊन जीवनाचा अर्थ साकल्याने पाहण्याचा, अनुभवण्याचा, त्याचे विवरण करण्याचा आणि कलात्मक प्रतीतीच्या अंगाने तो व्यक्त करण्याचा प्रयत्न संतांनी आपल्या कवितेतून केला.

सामाजिक परंपरेला फारसा धक्का न लावता व्यक्तीच्या आत्मविकासाच्या वाटा संतांनी भक्तिप्रधान धर्मकल्पनेत शोधल्या आणि समाजाचे आंतरजीवन समृद्ध केले.

अशा या संतकवितेत आधुनिक जीवनातील परिवर्तनाच्या, प्रगतिवादी, पुरोगामी जाणिवा कितपत आढळतात त्यांची तपासणी आणि मांडणी आपल्याला करावयाची आहे.

**०३. 'परिवर्तन', 'आधुनिक' व 'प्रगतिशील' किंवा 'पुरोगामी'**

परिवर्तन म्हणजे बदल. जीवनाच्या अनेक क्षेत्रात परिवर्तन होत असते. येथे सामाजिक परिवर्तनाचा विचार करणे योग्य होईल. सामाजिक परिवर्तन हे प्रत्येक समाजाचे व्यवच्छेदक आणि वैशिष्ट्यपूर्ण लक्षण असते. जैविक, भौतिक पर्यावरणात बदल होत असतो. त्याच्याशी अनुकूलन साधण्याच्या दृष्टीने सामाजिक परिवर्तन होणे गरजेचे असते. जैविक उत्क्रांतीचा प्रवास साध्या प्रकाराकडून गुंतागुंतीच्या प्रकारांकडे होत असतो. जैविक उत्क्रांतीच्या प्रक्रियेने सामाजिक परिवर्तन नियमित व नियंत्रित होते. जैविक प्रक्रिया अपरिवर्तनीय असते तर सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया उलटविता येते. वाढ, विकास आणि प्राप्ती ही सामाजिक परिवर्तनाची आदर्शात्मक रूपे आहेत. मानवी नियोजन, विज्ञान-तंत्रज्ञान आणि लोकांचा सहभाग यामुळे परिवर्तनाला गती मिळते. समाजाची संरचना आणि त्याच सांस्कृतिक आकृतिबंध यातील बदल म्हणजे परिवर्तन होय. सामाजिक परिवर्तन म्हणजे परंपरागत समाजाचे आधुनिक आणि प्रगत समाजात रूपांतर होत जाणे होय.

येथे 'आधुनिक', 'प्रगतिशील' या संज्ञांचे स्पष्टीकरण केले पाहिजे.

'आधुनिक' ही युरोपियन संकल्पना आहे. 'आधुनिक' (मॉडर्न) म्हणजे 'नवीन' या अर्थाने ही संज्ञा इतर क्षेत्रांप्रमाणे वेगवेगळ्या वाङ्मयीन कालखंडासाठीही वापरण्यात येते. 'आधुनिकता' (मॉडर्निटी) ही संज्ञा १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून विसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत युरोपमध्ये जी औद्योगिक, आर्थिक, राजकीय व सामाजिक स्थित्यंतरे झाली आणि ज्या वैचारिक घडामोडी झाल्या त्यासाठी वापरली जाते. 'आधुनिकतावाद' (मॉडर्निझम) ही संज्ञा या काळातील कलांना छेद देणाऱ्या आंतरराष्ट्रीय चळवळींचे स्वरूप व्यक्त करण्यासाठी वापरली जाते. आधुनिकतावादी मानसिकतेवर जर्मन विचारवंत फ्रीड्रिख नित्शे यांच्या परंपरागत नैतिकतेच्या प्रति-तत्त्वज्ञानात्मक विश्लेषणाचा मोठा प्रभाव आहे. कार्ल मार्क्स, सिग्मंड फ्रॉइड यांच्या विचारांनीही आधुनिकतेला घाट दिला आहे.

आधुनिक विचारविश्वातील एक महत्त्वपूर्ण विचार-प्रणाली म्हणून 'प्रगतिशील' विचारप्रणालीकडे पाहता येते. 'प्रगतिशील' ही हिंदी साहित्यसमीक्षेत रूळलेली पारिभाषिक संज्ञा आहे. 'प्रगतिशील' हे 'प्रोग्रेसिव्ह' या

इंग्रजी संज्ञेचे भाषांतर आहे. या अर्थाने मराठीत 'प्रगतिशील' पेक्षा 'पुरोगामी' ही संज्ञा अधिक रूळलेली आहे. मे. पु. रेगे[२] यांचे बोट धरून आपण तिचा अर्थ समजून घेऊ.

पुरोगामी म्हणजे पुढे जाणारा. पुढे म्हणजे कुठे? तर असे मानले गेले की मानवी इतिहासाला एक दिशा असते. इतिहासात अटळपणे माणसांची प्रगती होत असते. अधिकाधिक प्रगत सामाजिक स्थितीकडे नेणाऱ्या इतिहासाच्या ओघाला जो संमुख असतो, त्या ओघाबरोबर पुढे जाण्याची ज्याची मानसिक तयारी असते तो पुरोगामी.

जे इतिहासात लुप्त होत आहे ते टिकविण्याचा, जे लुप्त झाले त्याचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न जे करतात ते प्रतिगामी होत. अशा पुनरुज्जीवनवादी वृत्तीत स्वार्थ असतो. स्वतःच्या नष्ट होऊ पाहत असलेल्या हितसंबंधांना जपण्याची धडपड असते. त्यामुळे प्रतिगामी लोक इतिहासाचा ओघ उलटा फिरविण्याचा प्रयत्न करतात.

पुरोगामी मात्र इतिहास जे नवे घडवू पाहत आहे त्याचे स्वागत करतो. कारण जे नवे असते ते प्रगत असते. त्यामुळे अधिक लोकांना अधिक प्रमाणात स्वातंत्र्य, न्याय व सुबत्ता मिळणार असते.

फ्रेंच राज्यक्रांतीचे प्रवक्ते असलेले व्हाल्टेअटसारखे विचारवंत मानवी इतिहास हा प्रगतीचा इतिहास आहे असे मानीत नव्हते. आपल्या काळापर्यंतचा मानवी इतिहास हा माणसाच्या मूर्खपणाचा, दुर्दैवाचा आणि गुन्ह्यांचा इतिहास आहे, असेच ते मानीत. पण आता परिस्थिती बदलत चालली आहे. सामाजिक पुनर्रचनेला अडथळा करणारी धार्मिक अंधश्रद्धा हटत चालली आहे. वैज्ञानिक विचार पद्धती, वैज्ञानिक ज्ञान आणि तंत्रज्ञान यांचे साहाय्य मिळणे शक्य झाले आहे. तेव्हा माणसांनी पुरेसा समंजसपणा दाखविला तर मानवी जीवन अधिकाधिक सुखी करता येणे शक्य आहे; अशी त्यांची भूमिका होती.

एकोणिसाव्या शतकात यापुढे जाऊन मानवी इतिहास हा अनिवार्यपणे प्रगतीचा इतिहास आहे, या सिद्धांताचा पुरस्कार करण्यात आला. हेगेलचे इतिहासाचे तत्त्वज्ञान अशाप्रकारचे आहे. कार्ल मार्क्सने त्याला भौतिकवादी कलाटणी दिली. उत्क्रांतिवादी तत्त्वज्ञ हर्बर्ट स्पेन्सर यांनी विश्वाच्या घडणीत आणि घडामोडीत प्रगतीच्या संकल्पनेला महत्त्वाचे स्थान दिले.

एकोणिसाव्या शतकातील प्रगतिवादामागे उपयुक्तावादी (युटेलीटेरियन) प्रेरणा होती. व्यक्तीला स्वातंत्र्य असावे. सामाजिक संस्थांमध्ये सुधारणा करून त्यांना अधिक उपयुक्त स्वरूप द्यावे. सामाजिक संबंध समतेवर आधारलेले असावेत; असे धोरण होते.

अशाही समाजात वर्गभेद असतात. कार्ल मार्क्सने त्यातील वर्गकलहाचे विश्लेषण केले आणि विरोधविकासवादाच्या गतिशीलतेची द्वंद्वात्मक मांडणी केली. समाजामध्ये उत्पादनसाधनांची मालकी असणारा एक भांडवलदारांचा वर्ग असतो. या उत्पादनप्रक्रियेत श्रमशक्ती विकूनच सहभागी होणारा दुसरा मजुरांचा श्रमजीवी वर्ग असतो. हे वर्ग केवळ भिन्न नसतात तर परस्परविरोधी ही असतात. श्रमजीवी वर्गाचे आर्थिक शोषण करूनच भांडवलदार वर्ग अधिकाधिक संपन्न होत जातो. त्यामुळे श्रमजीवी वर्ग दरिद्री पण संघटित होत जातो. त्याची वर्गीय अस्मिता प्रखर होते. तो या व्यवस्थेविरूद्ध बंड करतो. भांडवलशाही नष्ट करतो आणि उत्पादनाची साधने समाजाच्या वतीने ताब्यात घेतो. थोडक्यात फ्रेंच राज्यक्रांतीने अर्धवट केलेली क्रांती श्रमजीवी क्रांती पूर्ण करते. इथे इतिहासाच्या एका पर्वाचा अंत होतो. त्यानंतरचा माणसाचा इतिहास म्हणजे माणसाच्या मुक्त आविष्काराची कहाणी असते.

इ. स. १९३० पासून मराठीला मार्क्सवादाचा परिचय होऊ लागला. 'पुरोगामी' हे बिरूद प्रचारात आले. त्यात उपयुक्ततावाद आणि मार्क्सवाद यांचे मिश्रण झालेले होते. मार्क्सवाद्यांच्या वेगवेगळ्या गटांनी पुरोगामी या संज्ञेचे वेगवेगळे अर्थ लावले. मार्क्सवादी मान्य नसणाऱ्यांनी 'पुरोगामी' शब्दाचा ढोबळ अर्थ घेऊन जीवनाला पुढे नेणाऱ्या, ते विकसित करणाऱ्या जाणिवांचे वाङ्मय असा ऐसपैस अर्थ घेतला. येथे विकासाचा, प्रगतीचा नेमका कोणता अर्थ आपल्याला अभिप्रेत आहे, ते सांगण्याची जबाबदारी येते. ती टाळून ढोबळ अर्थाने आणि सैल पद्धतीने हा शब्द वापरला गेला, तसा तो वापरला तर जवळजवळ सगळ्याच साहित्याला 'पुरोगामी साहित्य' म्हणावे लागेल.

### ०४. पुरोगामी आणि संतसाहित्य यातील विरोध

तथापि 'पुरोगामी साहित्य' या संज्ञेचा ऐतिहासिक आणि काटेकोर अर्थ घेतला तर संतकवितेत तशा जाणिवा शोधणे शक्य होणार नाही. मानवी जीवनाचा इतिहास हा प्रगतीचा इतिहास आहे; असे पुरोगामी मानतात. याउलट वैदिक, बौद्ध व जैन या तिन्ही परंपरामध्ये सत्ययुग किंवा कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग आणि कलीयुग ही कालपरंपरा अध:पतनताची, अवनतीची आणि ऱ्हासाची मानली जाते. पुरोगामी जडवादी आणि भौतिकवादी आहेत. तर संत चिद्‌वादी आणि अध्यात्मवादी आहेत. 'देव मरण पावला आहे' ही नित्शेची घोषणा आहे तर संतकविता ईश्वरकेंद्रित आहे. 'धर्म ही अफू आहे' असा मार्क्सचा निर्वाळा आहे. तथाकथित धर्म, नीतिकल्पना आणि धार्मिक विचारप्रणाली यांचा फोलपणा मार्क्स यांनी दाखविला आणि कष्टकऱ्यांच्या शोषणाची हत्यारे म्हणून त्याकडे पाहिले. संतांनी धर्म, नीती यांच्याकडे जनसामान्यांच्या मुक्तीच्या वाटा म्हणून पाहिले. औद्योगिकरणानंतरच्या शहरी जीवनाशी आधुनिकतेचा, सगळ्यात जास्त संबंध आहे. संतकविता ही ग्रामीण पर्यावरणात फुललेली आणि लोकबोली, लोकछेद यांच्याशी सलगी करणारी आहे. परंपरेला विरोध, शैली आणि घाट यांना दिलेले महत्त्व आणि आत्यंतिक प्रयोगशीलता ही आधुनिकतावादी वाङ्‌मयाची संतकवितेत दाखविता येणारी नाहीत. अशाप्रकारे संतकविता आणि आधुनिकता यात एक ठळक विरोध दृगोचर होतो.

त्यामुळे पुरोगामी मंडळी संतांचे अवमूल्यन करताना दिसतात. रावसाहेब कसबे म्हणतात, "ऐतिहासिक दृष्ट्या संतांचे कार्य म्हणजे प्रस्थापित व्यवस्थेचे संरक्षण होय. संत हवेत बोलले. त्याचा समाजावर काहीही परिणाम झाला नाही."[०३]

यापेक्षाही अधिक टिपेच्या स्वरात यशवंत मनोहर[०४] म्हणतात, भूतकाळातील विषमतेत स्वार्थ आणि प्रतिष्ठा गुंतलेल्यांनाच संत पूजनीय वाटतात.. 'पसायदान' म्हणजे वर्णव्यवस्थेचा जाहीरनामा व मानवतावादाचा पंचनामा होय. शोषणाची सगळी कलमे पोटात वागविणारी संतांची भक्तिकल्पना ही उत्कृष्ट बनवाबनवी आहे. या भक्तीने माणसे निर्बुद्ध व आंधळी केली. .... संत प्रतिक्रांतिवादी परंपरेतील होते. संतांची शिकवण पुसून काढल्याशिवाय आमच्या समाजाचे पाऊल आहे त्या ठिकाणाहून पुढे पडायचे नाही.

एकूण पुरोगामी मंडळींच्या दृष्टीने संतपरंपरा गोठलेली आहे. इतिहासजमा झालेली आहे. ती सामाजिक परिवर्तनाच्या विरोधी आहे आणि म्हणून त्याज्य आहे.

### ०५. परंपरा आणि आधुनिकता

यापेक्षा अगदी वेगळा आणि विधायक सूर न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्या विवेचनात उमटला आहे. त्यांनी मद्रास येथे 'हिंदू प्रोटेस्टंटिझम'वर व्याख्यान दिले. त्याचा 'era making address' म्हणजे 'युगप्रवर्तक व्याख्यान' असा गौरव मद्रासच्या 'हिंदू' या वर्तमानपत्राने केला आहे. 'Rise of the Maratha Power' ('मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष') या आपल्या ग्रंथात त्यांनी हा विचार परिष्कृत स्वरूपात मांडला आहे. त्यांच्या मते[०५] — संतांनी मराठी भाषेची अभिवृद्धी करणारे सौंदर्यपूर्ण साहित्य निर्माण केले.

आपल्या चारित्र्याने, शिकवणीने व साहित्याने संतांनी जातिसंघटनेची कर्मठ दृढता शिथिल केली.

शूद्रांना जवळ जवळ ब्राह्मणांच्या बरोबरीने आध्यात्मिक अधिकार आणि सामाजिक महत्त्व दिले.

स्त्रीची पदवी वाढवून कौटुंबिक परस्पंरसंबंधांना पावित्र्य दिले.

सामाजिक परस्परसंबंधात सहिष्णुता आणली.

हिंदू-मुस्लीम संबंधात जवळीक निर्माण केली.

कर्मकांड, उत्सव, यात्रा, उपास, ज्ञान यांचे महत्त्व तुलनेने कमी करून प्रेम आणि श्रद्धा हा ईश्वरोपासनेचा उत्कृष्ट मार्ग असल्याचे सांगितले.

बहुदेवतावाद नियंत्रित केला. समाजाला एकात्म केले.

विचार व कृती या दोन्ही दृष्टींनी राष्ट्राचे सामर्थ्य वाढविले. परकीय सत्तेच्या जागी स्वदेशी सत्तेची पुनर्स्थापना करण्यासाठी भारतातील कोणत्याही प्रांतापेक्षा महाराष्ट्राला अधिक बळ पुरविले.

अशा प्रकारे न्या. रानडे यांनी आपले सांस्कृतिक संचित म्हणून संतांचे जीवन, साहित्य, विचार व कार्य याकडे पाहिले. आणि शिवकालीन मराठी सत्तेच्या

उत्कर्षाला आणि सामाजिक उन्नयनाला प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे संतसाहित्याचे साह्य झाल्याचा सर्वंकष दावा केला.

या संदर्भात न्या. म. गो. रानडे स्वतःला 'नवभागवत-पंथी' म्हणवितात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. न्या. रानडे, महात्मा गांधी, स्वामी विवेकानंद, महर्षी वि. रा. शिंदे, आचार्य विनोबा भावे, धर्मानंद कोसंबी यांनी आपल्या जगण्यातून आणि विचारकृतीतून वेगळी भूमिका घेतल्याचे दिसते. "भारतीय परंपरा जिवंत व प्रवाही आहे. नवीन आव्हानांना विधायक वृत्तीने सामोरे जाण्याचे, आत्मशोध घेण्याचे आणि सुधारणा करण्याचे सामर्थ्य तिच्यात आहे. ...भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या नेत्यांनी व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक–आर्थिक न्याय आणि आर्थिक-सामाजिक–राजकीय समता या मूल्यांच्या अधिष्ठानावर एक उन्नत नवसमाजाच्या उभारणीचे ध्येय अंगिकारले होते. अशा समाजाची उभारणी करण्यासाठी भारतीय नैतिक–आध्यात्मिक परंपरेचे योग्य स्वरूपात व प्रमाणात परिष्करण केल्यास ही परंपरा आधारभूत होऊ शकते अशी ब्र. केवलानंद सरस्वती यांची धारणा होती."[०६]

या वेगळ्या भूमिकेने पाहू गेल्यास संतकविता आणि आधुनिकता यात काही अनुबंध आढळतात. इस्लाम आणि ख्रिश्चन या दोन्ही धर्मांनी भारतात आपापल्या धर्माचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला. त्यात त्यांना जेवढे यश आले त्यापेक्षा अधिक यश युरोपातील आधुनिक युगधर्माला आलेले दिसते. आधुनिक युगधर्म भारतात जसा आणि जितका स्थिरपद झाला त्यामानाने तो युरोपच्या बाहेर इतर देशांत क्वचितच स्थिरपद झाला.

ह्या गोष्टीचा उलगडा करताना अधिकारी विद्वानांचा हवाला देऊन अशोक केळकर म्हणतात, "... हिंदूंची एकंदर जीवनदृटी आणि युरोपीय रनेसांस, तसेच युरोपीय प्रबोधन यांमधून ज्यांचा उद्घोष झाला ती जीवनमूल्ये या दोहोंमध्ये एक लक्षणीय अनुबंध आहे."[०७]

मराठी संतसाहित्याच्या संदर्भात आपणाला या विधानाचा तपशिलाने शोध घेता येईल व मांडणीही करता येईल.

युरोपीय पुनरुज्जीवनाने (रनेसांस) जगाला पंधराव्या-सोळाव्या शतकात इहवाद, व्यक्तिवाद आणि राष्ट्रवाद दिला. युरोपीय प्रबोधनाने (एन्लायटनमेंटने) अठराव्या शतकात जगाला समतावाद, उपयुक्ततावाद आणि बुद्धिप्रामाण्यवाद दिला. या मूल्यांनी माणूस आणि त्याच्या भोवतालचे विश्व यांच्या संबंधांचे स्वरूप बदलले. माणसाने विश्व बुद्धिप्रामाण्याने समजून घ्यावे आणि माणसाला ते कसे अधिक उपयुक्त होईल या दृष्टीने बदलण्याचा प्रयत्न करावा स्वतःच्या समाजात माणूस आणि माणूस यांचे संबंध समतेच्या पायावर आधारलेले असले पाहिजेत. बाहेरच्या समाजात वागताना राष्ट्रभावना जपली पाहिजे. माणसाचा स्वतःशी जो संबंध आहे तो व्यक्तिवादी असावा. परतत्त्वाशी असलेल्या संबंधापेक्षा इहवादी संबंधाचा स्वीकार करावा.

या आधुनिक जीवनमूल्यांच्या जवळ जाणारी काही मूल्ये आणि परिवर्तनाकडे संकेत करणाऱ्या जाणिवा आपल्याला मराठी संतकवितेत दिसतात. अर्थात त्यांचे काहीसे परिष्करण करावे लागेल. ते कसे करता येईल याची काही उदाहरणे येथे देता येतील.

**०६.संतकवितेतील जाणिवांच्या आधुनिकिकरणाच्या दिशा**

परंपरागत श्रुती–स्मृती–पुराणे–शास्त्रे यांचे प्रामाण्य संतांनी औपचारिक पातळीवर मान्य केले आहे. पण त्यांचा भर ग्रंथप्रामाण्यापेक्षा आत्मप्रामाण्यावर अधिक आहे. संस्कृत आणि मराठी या भाषांच्या संघर्षाचा एक धागा आत्मप्रमाणाशीही जोडलेला आहे. यादृष्टीने पुढील वचने पाहण्यासारखी आहेत.

०१. एथौनि वारिले ते न कीजे की ।- सूत्रपाठ,आचार २५३.
तुम्हा एथौनि म्हणितले ते करणीये की गा। – सूत्रपाठ, आचार २५४

जे येथून (म्हणजे परमेश्वररूप श्रीचक्रधरांनी ) सांगितले असेल ते करावे, त्यांनी जे निषिद्ध ठरविले असेल ते करू नये. असे चक्रधरांनी जे सांगितले ते स्वतःच्या अधिकाराने आणि स्वतःच्या प्रामाण्याने सांगितले.

०२. चित्त ठेवी ग्वाही। आणिकोशी चाड नाही।।
तुकाराम गाथा ५७८.३.
सत्य–असत्याशी मन केले ग्वाही।
मानियेले नाही बहुमता।। तु.गा. १३३३.१३.






मना वाटे तैसी बोलितो वचने। तु.गा. ४६०६.१

अशा निर्भयपणे तुकाराम बहुमताविरूद्ध जाऊन सत्य पारखून घेतात आणि स्वानुभवाशी इमान बाळगून बिनदिक्कतपणे सांगतात. 'तुका कुणबी नेणे शास्त्रमत' अशी शास्त्रमताविषयी उदासीनता दाखवून ते

वेदांचा अर्थ तो आम्हांसी च ठावा
येरांनी वाहावा भार माथां। – तु. मा. २२५६.

श्रुतींचा अर्थ स्वयंप्रज्ञेने लावण्याची भाषा बोलतात.

०३. तैसे ज्ञानिये जें होंति। तें वेदार्थातें विचारिती
मग अपेक्षित स्वीकारीति। संसार जें।। ज्ञानेश्वरी २।२६३.

अशी वेदांची चिकित्सा करण्याची, त्यातील सार स्वीकारण्याची म्हणजेच असार ते गाळण्याची भाषा ज्ञानदेवांनी केली आहे. यापुढे जाऊन

परी शिवें कां श्रीवल्लभें। बोलिलें येणेंचि लोभें
मानूं ते हें लाभे। न बोलतांही।। अमृतानुभव ३।१८

हे शिव किंवा विष्णू यांनी सांगितलेले असो की नसो त्याच्या लाभासाठी आपण ते मानू; असे त्यांनी म्हटले आहे.

एवं दशोपनिषदें। पुढारी न ढळती पदें
देखोनि बुडी बोधें। येथेंचि दिधली।। अमृतानुभव १०।१८

दशोपनिषदेही यापेक्षा अधिक सांगू शकत नाहीत; असा स्वतःच्या बोधाविषयीचा आत्मविश्वस्तभाव ज्ञानदेवांनी व्यक्त केला आहे. अशी किती तरी वचने संतकवितेत सापडतात.

नवसे कन्या पुत्र होती। तरी का करणे लागे पती।। – तु. गा. ३२९.४
तीर्थी धोंडा–पाणी। देव रोकडा सज्जनी

अशी अंधश्रद्धेवर आघात करणारी वचने आहेत. त्यात चिकित्सेचा आढळ होतो.

तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते
स्वयंभू आइते, केले नव्हे।। – तु. गा. २९५.

असा स्वतःच्या स्वयंभू सामर्थ्याचा हुंकार आहे. स्वानुभवाला दिलेले प्रामाण्य आहे.

संतांची ही चिकित्सक वृत्ती आणि आत्मप्रत्ययाचा फुंद बुद्धिप्रामाण्य या आधुनिक तत्त्वाची पायाभरणी करणारा आहे असे आपल्याला म्हणता येईल. स्वानुभव आणि चिकित्सा यांनी येणारी आत्मप्रतीती बुद्धिप्रामाण्याच्या जवळ जाणारी आहे.

व्यक्तिवाद हे आधुनिक संस्कृतीत उदयाला आलेले मूल्य आहे. आजच्या नैतिक–सामाजिक विचारात व्यक्तिवाद हे मूल्य अंतिम आहे. मूलभूत आहे. व्यक्तिवादाप्रमाणे समाज हा स्वतंत्र, आत्मकेंद्री व्यक्तींचा समुदाय आहे. येथे व्यक्ती प्रथम आहे. त्यामुळे समाजात व्यक्तीच्या स्वातंत्र्याला अवसर मिळाला पाहिजे. व्यक्तीचे कल्याण साधले गेले पाहिजे. ही प्राथमिक व मूलभूत साध्ये ठरतात. मानवी व्यक्तीला एक स्वयंभू प्रतिष्ठा आहे. प्रत्येक व्यक्ती स्वतंत्र्य व स्वायत्त आहे. या जाणिवेवरच सामाजिक समता आणि सामाजिक न्याय ही मूल्ये उभी असतात.

मध्ययुग समूहजीवनाला प्राधान्य देणारे युग आहे. येथे व्यक्तिवादाला वाव नाही. असे असूनही संतांच्या कवितेत आत्मविष्काराच्या उर्मीने भक्तिभावनेचे उभड ओसंडून वाहत आहेत. मध्ययुगात आत्मनिष्ठ भावनांचा हुंकार कामी येतो तो भक्तीच्या विशिष्ट प्रकारामुळे. स्मरण–आत्मनिवेदन–सख्यभाव हे नवविधा भक्तीचे काही प्रकार यादृष्टीने महत्त्वाचे आहेत. त्यामुळे समूह-जीवन जगत असतानाही संतांना स्वतःच्या हृदयाचा कानोसा घ्यावासा वाटला. भक्तीची वाट चालताना त्यांच्या अंतःकरणातील खोल खळबळीचे हे गोड उद्गार अभंगरूप पावले. त्यामुळे समकालीन जनजीवनाचे स्वरूप वेगळे असतानाही त्यांच्या हातून आत्मपर कविता लिहिली गेली.

व्यक्तिवादात व्यक्तीची कर्तव्येही अनुस्यूत असतात. यादृष्टीने संतांनी धरलेला स्वधर्मपालनाचा आग्रह महत्त्वाचा आहे. प्रत्येक व्यक्तीचा एक स्वधर्म असतो. तो तिला जन्मतः प्राप्त होतो. स्वधर्म हा सर्व माणसांना समान असलेला साधारणधर्म असतो. 'परोपकाराय पुण्याय। पापाय परपीडनम्' हा असा साधारणधर्म आहे. स्वधर्माचे स्वरूप संतांनी जातिविशिष्ट समाजात राहून मांडलेले आहे. त्यामुळे वर्णविहित कर्मे पार पाडण्याची

जबाबदारी असा अर्थ त्यांच्या स्वधर्मकल्पनेला प्राप्त होतो. रामासमोर पतिधर्म आणि राजधर्म यांच्यातले द्वंद्व उभे ठाकले होते. अर्जुनासमोर बंधूधर्म की क्षात्रधर्म असा पेच होता. अशावेळी व्यक्तीला आपला स्वधर्म ओळखता आला पाहिजे. स्वधर्म ओळखून त्याप्रमाणे वागले नाही तर अर्थातच व्यक्ती पापाची वाटेकरी होते. परिणाम भोगण्याची तयारी असेल तर यापैकी काय करावे ते ठरविण्याचे स्वातंत्र्य व्यक्तीला असते. स्वधर्म काय आहे ते ठरविण्याचे व्यक्तीला स्वातंत्र्य नाही. स्वधर्म निवडता येत नाही तो प्राप्त झालेला असतो.

आचार्य विनोबा भावे[८] यांनी स्वधर्माला 'आई' म्हटले आहे. आई ही जन्मतःच प्राप्त होते. तेथे निवड करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. ज्ञानदेवांनी स्वधर्महीन जीवाला 'भातारेहीन वनिता'[९] असे म्हटले आहे. येथे स्वधर्मासाठी पत्नी हे उपमान गृहीत आहे. साहजिकच स्वधर्म हा निवडता येतो असेही म्हणता येईल. समाजाशी ज्या अनेक नात्यांनी माणूस बांधला जातो त्या नात्याने येणारी प्राप्त कर्तव्ये चोखपणे पार पाडणे असा स्वधर्माचा अर्थ स्वीकारता येईल. ही संकल्पना केवळ जाति-वर्णाधिष्ठित समाजाप्रमाणे धर्मनिरपेक्ष लोकशाही समाजातही वापरता येईल. आपला कल आणि क्षमता पाहून तो निवडायचा असतो ही आधुनिक काळाची अपेक्षा असते. ती मान्य केली तर स्वधर्म ही संतांची संकल्पना वैयक्तिक कर्तव्यपालनाची आणि सामाजिक सदाचाराची संकल्पना म्हणून आधुनिक काळातील कोणत्याही समाजात आणि कोणत्याही जीवनक्षेत्रात वापरता येईल.

प्रत्येक मानवी व्यक्तीची व्यक्ती म्हणून एक प्रतिष्ठा असते. त्या प्रतिष्ठेवर मानवी समतेचे तत्त्व अवलंबून असते. माणसामाणसांचे परस्परसंबंध समतेच्या पायावर आधारलेले असले पाहिजेत ही आधुनिक युगाची अपेक्षा आहे. विश्वाकडे समदृष्टीने पाहणाऱ्या सर्वच संतांना समतेचे तत्त्व अर्थातच मान्य होते. चंद्रभागेच्या वाळवंटात भक्तभाविकांना आपल्यातील उचनीचभावाचा विसर पडतो. 'एक एकाच्या पडती पाया' ही वारकऱ्यांची रीतही समतेची रीत आहे. माणूस हा ईश्वराचा अंश आहे, या संतांच्या धारणेवर मानवी व्यक्तीची प्रतिष्ठा आणि मूलभूत मानवी समता अवलंबून आहे. मानवी प्रतिष्ठा आणि समता ह्या मूल्यांना ऐहिक व्यवस्थेत स्थान देण्यासाठी जी मनोवृत्ती आवश्यक आहे ती ह्या आध्यात्मिक-धार्मिक मूल्यांनी घडविलेली आहे.

व्यक्तिवाद, समता आणि न्याय यातून आधुनिक समाजात माणसाचे हक्क ही कल्पना उदयाला येते. जीविताचे रक्षण, कृती करण्याचे स्वातंत्र्य, इच्छित सुखाचे संपादन आणि स्वतःच्या श्रमाने निर्माण केलेल्या साधन-संपत्तीवरील स्वामित्व हे असे हक्क आहेत. हे हक्क समाजाच्या मर्यादेत राहून मान्य करण्यात न्याय असतो. कोणाला हे हक्क नाकारले जात असतील तर ते अन्यायाचे आहे. पारंपरिक समाजात स्त्री-शूद्रांना आतापर्यंत समान संधी, समान हक्क आणि समान स्वातंत्र्य नाकारण्यात आले. हा समाज अन्यायावर आधारलेला होता. तेव्हा व्यक्तींचे समान हक्क ह्या तत्त्वाला अनुसरून पारंपरिक समाजाची पुनर्रचना करणे नैतिक दृष्टीने आवश्यक आहे.

याविषयी संतांची भूमिका पाहू. निसर्ग आणि समाज यांची चौकट ईश्वरदत्त आहे. आपल्याला हवी तशी ती वाकविता येत नाही. ही माणसाच्या कर्तृत्वाची मर्यादा आहे. तेव्हा ती स्वीकारूनच स्वतःसाठी व इतरांसाठी चांगले जीवन आपण घडवू शकतो; अशी संतांची समजूत होती. चातुर्वर्ण्यव्यवस्थेत व्यक्तीचे हक्क कसे हिरावून घेतले जातात; त्यामुळे व्यक्तीची कशी कोंडी होते, कुचंबणा होते ते त्यांना स्वानुभवाने जाणवत होते. आपल्या कवितेतून त्यांनी ती व्यक्तही केली आहे. ते असे मानीत की ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र हे भेद आहेत. पण ते वास्तव आहेत. ते नाकारता येत नाहीत. हे भेद नष्ट करणे माझ्या हातात नाही. कोणाच्याही हातात नाही. मग मी काय करावे? भेद असले तरी मी मात्र भेदाचा भाव मनातून काढून टाकावा. कोणाला भेदभावाची वागणूक देऊ नये. सगळ्यांशी समभावाने वागावे.

विष्णुमय जग। वैष्णवांचा धर्म
भेदाभेद भ्रम। अमंगळ। तु. गा. ४६.१

अशी माझी वागणूक असली पाहिजे.

दया करी जे पुत्रासी। तेच दासा आणि दासी।। तु.






गा. ३४७.५
मुलाबाळांशी जसे प्रेमाने वागावे तसेच दासदासींशीही प्रेमाने वागावे असे औदार्य संतांनी प्रकट केले. पण हा धनी आणि हा त्याचा दास हा भेद नष्ट करता येत नाही. तो कायम राहतो. असेही त्यांचे मत होते.

समाजव्यवस्थेमध्ये आपण जाणीवपूर्वक इष्ट ते बदल घडवून आणू शकतो; ही जाणीव आणि विश्वास हे आधुनिक समाजाचे वैशिष्ट्य आहे. न्यायाची आधुनिक संकल्पना समतेवर आधारलेली आहे. सर्व व्यक्तींना सर्वोतोपरी समान वागणूक मिळणे म्हणजे सामाजिक न्याय. विषम वागणूक देणे म्हणजे अन्याय आहे. आपल्या समाजातील जात आणि वर्ग हे भेद अन्यायकारक आहेत. त्यामुळे हे भेद नष्ट केले पाहिजेत.

यासाठी भेद असले तरी भेदाचा भाव न ठेवता संतांप्रमाणे वागणे पुरेसे होणार नाही तर ते भेद नष्ट व्हावेत यासाठी आपण झटले पाहिजे. ते आपले कर्तव्यच आहे. अशाप्रकारे आधुनिक युगापर्यंत संतांनी आपल्याला आणून सोडले आहे. नंतरची पायरी मात्र आपणच ओलांडली पाहिजे.

### ०७. आधुनिक युगाची संतदृष्ट्या समीक्षा

आधुनिक समाज हाच काय तो आदर्श समाज आहे; असेही मानता येण्यासारखे नाही. साम्यवादी समाजाच्या प्रयोगाचे रशियामध्ये काय झाले; ते आपण पाहिले आहे. त्याचप्रमाणे मुक्त समाजाचे अमेरिकेत काय होत आहे; तेही आपण पाहत आहोत. अशा वेळी आधुनिक समाजातील दोषांकडे आणि त्यांच्या दुष्परिणामांकडे आपण डोळे उघडे ठेवून पहावयास हवे.

स्वार्थप्रेरित व्यक्तिस्वातंत्र्य, अर्थ आणि काम यांच्याविषयीची अमर्याद तृष्णा आणि स्पर्धात्मक जीवन पद्धती या आधुनिक समाजातील उणिवांची संतांच्या दृष्टीने समीक्षा करता येण्यासारखी आहे. माणसाच्या स्वातंत्र्याला इतरांच्या सुखदुःखाची मर्यादा असली पाहिजे. धर्माच्या मर्यादेतच अर्थ आणि काम यांचा उपभोग घेणे योग्य ठरते. स्पर्धेपेक्षा "एकमेकां साह्य करू। अवघे धरू सुपंथ" ही संतांची शिकवण समाजाला अधिक उपयुक्त आहे. "त्यागावे ना भोगावे। मध्यभागी विभागाने" (एकनाथ) हा संतांनी दिलेला संयमाचा संदेश कोणत्याही काळातील कोणत्याही प्रकारच्या समाजाला हितकारक ठरणारा आहे.

संतांनी फळाची आशा आणि कर्तृत्वाचा अहंकार सोडून माणसाने निष्काम कर्म करावे असे सांगितलेले आहे. सर्वच कर्मे ईश्वराला अर्पण करावयाची असतील तर ती अपवित्र असणार नाहीत. शुद्ध असतील ही खबरदारी घ्यावी लागते. अशी विहीत कर्मे निष्काम बुद्धीने केल्यावर व्यक्ती सर्व बंधनातून मुक्त होते. मुक्त अवस्थेनंतरचे तिचे जगणे 'उरलो उपकारापुरते' असेच असते. ज्ञानोत्तर कर्म करणाऱ्या अशा व्यक्तीच्या वागण्यातच नीतितत्त्वे समूर्त आणि साकार होतात. 'जेयांचिये लीलेमाजी नीती जियाली दिसे' असा ज्ञानदेवांचा अभिप्राय आहे.

संतांनी फळाची आशा आणि कर्तृत्वाचा अहंकार सोडून माणसाने निष्काम कर्म करावे असे सांगितले आहे. सर्वच कर्मे ईश्वराला अर्पण करावयाची असतील तर ती अपवित्र असणार नाहीत. शुद्ध असतील ही खबरदारी घ्यावी लागते. अशी विहीत कर्मे निष्काम बुद्धीने केल्यावर व्यक्ती सर्व बंधनातून मुक्त होते. मुक्त अवस्थेनंतरचे तिचे जगणे 'उरलो उपकारापुरते' असेच असते. ज्ञानोत्तर कर्म करणाऱ्या अशा व्यक्तीच्या वागण्यातच नीतितत्त्वे समूर्त आणि साकार होतात. 'जेयांचिये लीलेमाजी नीती जियाली दिसे' असा ज्ञानदेवांचा अभिप्राय आहे.

नीतीचे जे रूप इम्यॅन्युएल कांटने प्रतिपादन केले आहे ते याच प्रकारचे आहे. व्यक्तीने केलेल्या ज्या कृत्यांचे परिणाम इतर व्यक्तींच्या सुखदुःखावर होतात ती कृत्ये नीतीच्या क्षेत्रात मोडतात. इच्छेच्या पूर्ततेसाठी नव्हे तर कर्तव्यभावनेने केलेले कृत्य म्हणजे नैतिक कृत्य. अशा कृत्यात आवडीनिवडीचा विचार नसतो. नफ्यातोटयाचा विचार नसतो तर नीतितत्त्वांचा आदर असतो. नैतिक कृती म्हणजे नैसर्गिक प्रेरणेला विवेक-शक्तीने दिलेला आकार असतो. भूक लागली की अन्न खाणे ही नैसर्गिक प्रेरणा आहे; पण जे अन्न उपलब्ध असेल ते सर्वांना सारखे किंवा गरजेच्या प्रमाणात वाटून देणे आणि आपल्या वाट्याला येईल तेवढ्यावर तृप्त

होणे ही नैतिक कृती आहे. माणसामध्ये वासना आणि विवेक यांचा झगडा आहे. माणूस हा पूर्ण विवेकी नाही. त्यामुळे नीतितत्त्वे किंवा नीतिनियम त्याला निरूपाधिक आदेश म्हणूनच स्वीकारावे लागतात. पण माणूस नीतितत्त्वांचे पालन करता करता पूर्ण विवेकी होतो. मग त्याला नीतितत्त्वे आदेशाप्रमाणे राहत नाहीत. हा मुक्त माणूस सर्व विधिनिषेधापलीकडे जातो. त्याला जे नैतिकदृष्ट्या कर्तव्य असते ते तो सहजपणे स्वभावतःच करीत असतो. त्याला कांटने 'होली विल' असे म्हटले आहे. संतांच्या ज्ञानोत्तर कर्म या संकल्पनेशी तिचे निकटचे साम्य आहे.

उपेक्षा, अहिंसा, अपरिग्रह ह्या आध्यात्मिक साधनेत फुललेल्या कल्पना आहेत. त्या नीतिपलीकडे जाणाऱ्या आहेत. आणि तरीही रेगे म्हणतात त्याप्रमाणे सामाजिक नीतीशी सुसंगत अशा त्या भावना आहेत.

**०८. समारोप**

वैदिक, बौद्ध आणि जैन या तिन्ही भारतीय परंपरांमध्ये एक समान जीवनपद्धती प्रतिपादन केली आहे. माणसाने निरहंकारी आणि निःस्पृह असावे. आत्मौपम्य बुद्धीने आणि आपपरभाव सोडून त्याने सर्व प्राणिमात्रांच्या हिताविषयी आस्था बाळगावी. असा हा जीवनमार्ग आहे. हा पाया स्वीकारून त्याच्याशी सुसंगत अशी व्यक्तिस्वातंत्र्य, समता आणि न्याय ही आधुनिक मूल्ये आपल्याला आत्मसात करता येतील. त्यातून समाज-परिवर्तनाला गती लाभेल.

छेदभेद असलेल्या समाजात संतसाहित्य निर्माण झाले. त्यामुळे त्या छेदभेदांचा वारसा संतसाहित्यातही राहिला आहे. या छेदभेदांचा निरास आधुनिक मूल्यांचा स्वीकार केल्याशिवाय होणार नाही. त्यामुळे संत-साहित्यातील मूल्यांची आधुनिक परिभाषेत कालानुरूप नवी मांडणी करावी लागेल. प्राचीन भारतीय मूल्ये व कल्पना यांवर गांधीवादी जाणिवा आणि मूल्ये यांचे संस्करण करून त्यांना आजही कार्यक्षम व सुप्रतिष्ठित करण्याची किमया आचार्य विनोबा भावे यांनी 'गीतप्रवचने' आणि साने गुरुजी यांनी 'भारतीय संस्कृती' या ग्रंथांत करून दाखविली आहे. मराठी संतसाहित्यविचाराशी अशी कालानुरूप मांडणी करणाऱ्या महामती, सहृदय आणि समाजचिंतकाची आज गरज आहे. असे झाले तर स्वत्वरक्षण आणि आधुनिकतेकडे जाण्याची एक एक पायरी म्हणून संतकवितेतील जाणिवांचा आधार घेता येईल.

**०९. संदर्भ आणि टीपा**

०१. आचार्य विनोबा भावे (संपा.), "एकनाथांची भजने", पवनार (वर्धा), १९८४ पृ. ३०.

०२. मे. पुं. रेगे, "हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन", वाई, दुसरी आवृत्ती २००२ (प. आ. १९९४) पृ. १४७-१५१ या ग्रंथाचा आधार एकूण विवेचनालाही आहे.

०३. रावसाहेब कसबे, "संतवाङ्मयाचे पुनर्मूल्यांकन", समुचित, ऑनोडि, १९८६ पृ. २०७-२१९. साररूपाने उद्धृत.

०४. यशवंत मनोहर, समाजप्रबोधनपत्रिका, जानेवारी-फेब्रुवारी, १९८३, साररूपाने उद्धृत.

०५. म. गो. रानडे, "राइज ऑफ द मराठा पॉवर" १९००. साररूपाने भाषांतर करून उद्धृत.

०६. मे. पुं. रेगे, "हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन", उनि., सीताराम रायकर (प्रकाशक) यांचे "दुसऱ्या संवर्धित आवृत्तीच्या निमित्ताने" हे निवेदन.

०७. अशोक केळकर, "भारतीय ललित कला (आधुनिक) वयात येतात", पंचधारा, एमेज् १९८६ पृ. ३३.

०८. आचार्य विनोबा भावे, "गीता-प्रवचने", पृ. ११.

०९. ज्ञानेश्वर, "ज्ञानेश्वरी", अध्याय दुसरा, ओवी १९९.

**टीप :-**

✡ 'हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन' या ग्रंथात तत्त्वज्ञ मे. पुं. रेगे यांनी वेदोपनिषदे-षडदर्शने--अवैदिक दर्शने यांचा सामाजिक परिवर्तनाशी कसा अन्वय जोडता येईल. याचे दिग्दर्शन केले आहे. ही भूमिका मध्ययुगीन मराठी संतकवितेच्या संदर्भात कशी चरितार्थ होऊ शकते, ते दाखविण्याचा माझा प्रयत्न आहे.

✡ प्रस्तुत शोधनिबंध बलभीम महाविद्यालय, बीड येथे याच विषयावर झालेल्या चर्चेचा प्रस्तावक म्हणून मी सादर केलेला होता.










# ब्रिक : नवजागतिक व्यवस्थेची नांदी ठरू शकेल?

प्रा. विठ्ठल दहिफळे

रशियातील येत्करिनबर्ग येथे गेल्या महिन्यात झालेली ब्रिक देशांच्या नेत्यांची परिषद ही जागतिक राजकारण आणि अर्थकारणातील एक महत्त्वपूर्ण घटना होती. जगातील एकूण चलन साठ्याच्या चाळीस टक्के व एकूण लोकसंख्येच्या निम्म्या भागाचे नेतृत्व अशा देशातील नेते जेव्हा एका व्यासपीठावर विशेषत्वाने जागतिक अर्थव्यवस्थेच्या लोकतांत्रिकीकरणाच्या काळात करतात तेव्हा साहजिकच त्याला अनेक परिमाणे प्राप्त होतात.[१] जग आज एका मोठ्या संक्रमणातून जात आहे. मागील दीड एक वर्षापासून अमेरिकेतील गृहतारण कर्जाच्या बाजार-पेठेतील (सब प्राईम) पेचामुळे आर्थिक अरिष्टाच्या विळख्यात सापडलेल्या जगाला मुक्त करण्यासाठी विविधांगी पातळ्यावर एकीकडे प्रयत्न केले जात असतानाच दुसरीकडे उग्र वंशवादी हल्ले आणि दहशतवादी हल्ल्यातील सततची वाढ यामुळे सर्वत्र भय व असुरक्षितेचे वातावरण निर्माण झालेले आहे. या पार्श्वभूमीवर रशियाच्या नेतृत्वाखाली पार पडलेल्या ब्रिक राष्ट्रांच्या परिषदेला आगळे-वेगळे महत्त्व आहे.

विद्यमान आर्थिक संकटाच्या पार्श्वभूमीवर आज नव-उदारमतवादी आर्थिक धोरणांच्या परिणामाबाबत गांभीर्याने चर्चा केली जात आहे. एप्रिलमध्ये लंडन येथे पार पडलेल्या 'G-20' या राष्ट्रगटाच्या परिषदेतही विकसित राष्ट्रांच्या अनिर्बंध बँकिंग व व्यापारविषयक धोरणावर सडकून टीका झाली होती. फ्रान्स व जर्मनीसारख्या राष्ट्रांनी तर बंडखोरीचे निशाण फडकावीत टॅक्स हेवन, हेजफंड व प्रोटेक्शनीझम या धोरणांना जोपर्यंत अटकाव घातला जात नाही, तोपर्यंत आर्थिक अरिष्टाचा गुंता सोडविण्याचा मार्ग खुला होणार नाही, यासाठी सकारात्मक पाऊले टाकण्याची राष्ट्रांची (अमेरिकादी) तयारी नसेल तर जागतिक वित्तीय संघटनातून बाहेर पडण्याचा आमचा पर्याय खुला आहे. अशी स्पष्ट व परखड भूमिका घेतली होती. एकूणच आर्थिक आणि राजकीय पातळीवर जग एका संक्रमणावस्थेतून जात असताना व पर्यायी अर्थव्यवस्थेच्या शोधार्थ चिंतन-मंथन होत असताना ब्रिक राष्ट्र नेत्यांची पहिली परिषद नेहमीच विकसित उदारमतवादी देशांच्या धोरणांचे वाजविणाऱ्या माध्यमांच्या अपुऱ्या प्रकाश झोतात संपन्न झाली, परंतु ज्यांचा व्यवस्थापरिवर्तनावर विश्वास आहे अशा आशावाद्यांसाठी मात्र ब्रिक समन्यायी नव-जागतिक अर्थव्यवस्थेला भविष्यात आकार देऊ शकेल याबाबत अंधुकसा का होईना, आशा किरण जागवून गेली. प्रस्तुत लेखात नव-जागतिक व्यवस्थेला आकार देण्यासाठी ब्रिक राष्ट्रांच्या अवकाशाचा शोध घेण्याचा प्रयत्न करण्यात आला असून या परिषदेला भवितव्य आहे काय याचा मागोवा घेण्यात आला आहे.

'ब्रिक' हे ब्राझिल, रशिया, भारत व चीन या चार उभरत्या गतिमान अर्थव्यवस्था असणाऱ्या विकसनशील देशांच्या आद्याक्षरापासून बनलेले संक्षिप्त रूप आहे. ही संकल्पना सर्वप्रथम गोल्डमन साक्स (अमेरिका) येथील जागतिक अर्थविषयक संशोधनाचे प्रमुख जीम ओ नेल (Jim O Neill) यांनी सन २००१ साली सर्वप्रथम प्रचारात आणली.[२] २००३ साली त्यांनी सादर केलेल्या अहवालात आपले मत नोंदविताना असे म्हटले होते की, सन २०५० पर्यंत जगाच्या अर्थसंरचनेत मूलभूत बदल होतील व ब्रिक देश बहुतांश पाश्चिमात्त्य विकसित देशांना मागे टाकत अमेरिका व जपानच्या बरोबरीने आर्थिक ताकद म्हणून पुढे येतील. तथापि सार्क किंवा आशियान सारखा एक आर्थिक गट वा व्यापारविषयक औपचारिक संघटन म्हणून ब्रिक स्वतःला सादर करेल काय, याबाबत मात्र त्यांनी काही खुलासा केला नाही. असे असले तरी या चार राज्यांची जगाच्या अर्थराजनीतीत ज्या पद्धतीने पाऊले पडत आहेत किंवा आपल्या गतिशील अर्थव्यवस्थांना एका भक्कम अराजकीय शक्तीत रूपांतरीत करण्याची त्यांची जी धडपड चालली आहे ती लक्षात

अनुक्रमणिका

घेतली असता एक मजबूत राजकीय क्लब किंवा अलायन्स म्हणून ब्रिकच्या उदयास सध्यातरी पर्याप्त अवकाश आहे हे मान्य करावे लागते. याची दोन मुख्य कारणे असू शकतात. एक म्हणजे जगावर आलेल्या आर्थिक अरिष्टातून मार्ग काढण्यात या चार राज्यांना मुख्य भूमिका पार पाडावी लागणार आहे. दुसरे म्हणजे जगाच्या राजकीय व्यवस्थेत अमेरिकेच्या प्रभुत्वाला उतरती कळा सुरू झाल्यामुळे निर्माण झालेल्या पोकळीत पारस्परिक राजकीय विश्वास, द्विपक्षीय व बहुपक्षीय करार आणि एकूणच पारस्पारिक सहकार्यात्मक यंत्रणेत सुधारणा करण्यास ब्रिक देशांना खूप संधी आहे. विश्वाची २५% जमीन व्यापलेल्या ब्रिकला समन्यायी, खुली व अधिकाधिक लोकतांत्रिक बहुध्रुवीय जागतिक अर्थव्यवस्था निर्माण करायची आहे.

रशियातील प्रमुख शहरापैकी एक असणाऱ्या येत्करिनबर्ग येथे १६ जूनला ब्रिक राज्यांची पहिली शिखर परिषद फारशी गाजावाजा न होता संपन्न झाली. विकसित राज्यांचे नेहमीच तुणतुणे वाजविणाऱ्या माध्यमांनी परिषदेची गांभीर्याने दखल घेतली नसली तरी ब्रिक राज्यांतर्फे जाहीर करण्यात आलेल्या सोळा परिच्छदीय संयुक्त जाहीर-नाम्यावर एक नजर टाकली असता विश्व अर्थ-राजनीतीला नवीन वळण देण्याचे सामर्थ्य ब्रिककडे निश्चित आहे हे मान्य करावे लागते. संयुक्त निवेदनाच्या पहिल्या दोन परिच्छेदांमध्ये 'जी-२०' राष्ट्रांच्या संघटनेने घेतलेल्या निर्णयांना पाठिंबा देऊन जगातील सर्व राज्यांनी त्याच्या अंमलबजावणीसाठी पाऊले उचलावीत असे आवाहन केले आहे. ब्रिक राज्यासमोर आज सर्वात मोठे आव्हान आहे ते म्हणजे डॉलरला समर्थ पर्याय कसा दिला जाऊ शकेल याचे. विद्यमान आर्थिक अरिष्टांची मूळे अमेरिकन 'फेडरल रिझर्व्ह' च्या चलनविषयक धोरणात सामावलेली आहेत. डॉलरच्या रूपात नको इतकी गंगाजळी निर्माण करण्याची मुभा इतर देशांना अमेरिका दीर्घ काळ देत राहिली त्यामधूनच हा पेच वाढत गेला आहे. रशिया व चीनला डॉलरच्या भवितव्याबाबत चिंता वाटते आहे. यामुळेच रशियाचे अध्यक्ष दिमित्री मेदवेदेव यांनी डॉलरला पर्याय म्हणून 'सुपरनॅशनल करन्सिची' संकल्पना मांडली आहे.[३] ब्रिक व शांघाय सहकार्य संघटनेतील (SCO) सर्व राज्यांनी व्यापारासाठी डॉलरऐवजी एकमेकांच्या चलनाचा वापर करावा असे त्यांनी आवाहन ही केले आहे. चीन हा डॉलरच्या जोखमीतील सर्वात मोठा हिस्सेदार असल्यामुळे तोही डॉलरच्या भवितव्याबाबत साशंकच आहे. या प्रयत्नांना ब्राझिलचा पाठिंबा आहे. परंतु भारत मात्र अद्याप पुरेशी स्पष्ट भूमिका घेऊ शकला नाही. याला काही कारणे असू शकतात. शीतयुद्धोत्तर काळात भारत-अमेरिका संबंधाला नवीन आयाम प्राप्त झाले आहेत. संरक्षणापासून ते व्यापारापर्यंत अशा विविध पातळ्यांवर भारत अमेरिका व्यूहात्मक संबंध दृढ होत आहेत. भारताशी आण्विक करार करून गतेतिहास आम्ही मागे टाकला आहे याची अमेरिकेने साक्ष दिली आहे. त्यामुळे आजमितीला तरी अमेरिकी हितसंबंधाना विरोध करण्याचे धाडस भारत करू शकत नाही ही वस्तुस्थिती आहे.

डॉलरला पर्याय देण्याचे ब्रिकचे प्रयत्न एकीकडे नव जागतिक अर्थव्यवस्थेच्या उदयासाठी स्तुत्य जरूर आहेत परंतु दुसरीकडे त्यामधून काही आव्हानेही निर्माण होणार आहेत. पहिले असे की सुपरनॅशनल करन्सिची संकल्पनाच मुळात संदिग्ध, अपरिपक्व आहे. डॉलरला पर्याय म्हणून नेमक्या कोणत्या चलनाचा वापर झाला पाहिजे हे सुस्पष्ट नाही. दुसरे म्हणजे रशिया-चीन भलेही डॉलरच्या पर्यायासंदर्भात तावातावाने चर्चा करीत असतील पण ब्रिकच्या संयुक्त निवेदनात मात्र त्याबाबत चकार शब्दही काढण्यात आला नाही. केवळ जागतिक अर्थव्यवस्थेत बदलाचे प्रतिबिंब उमटण्याच्या दिशेने आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थात सुधारण्यासाठी प्रगती झाली पाहिजे.[४] असे मोघम वाक्यप्रयोग करण्यात आले आहेत. यावरून आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत डॉलर संकटात असूनही त्याचे मूल्य अजूनही निर्विवाद आहे हे सिद्ध होते.

'कोणतीही जागतिक चलन व्यवस्था आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थात केवळ एक आणि एकाच चलनाचे वर्चस्व असताना यशस्वी होऊ शकत नाही' असे दिमित्री मेदवेदेव म्हणत असले तरी रशिया आणि चीन स्वतःच डॉलरच्या जोखमीतील सर्वात मोठे हिस्सेदार आहेत हे

नाकारता येत नाही. आजही रशियाचा एकूण आंतरराष्ट्रीय राखीव चलन साठ्याच्या तीस टक्के म्हणजे ४०९.५ बिलीयन डॉलर अमेरिकी डॉलर्समध्ये गुंतविला आहे तर चीनची १ ट्रिलीयन डॉलरची गुंतवणूक रोखे व कर्ज स्वरूपात अमेरिकी डॉलर्समध्येच आहे.[५] याकडे दुर्लक्ष करता येत नाही. यामुळे डॉलरला पर्याय देणे आजमितीला तरी या देशांना शक्य होणार नाही. तसे झाले तर डॉलरच्या मूल्यात मोठी घट होऊन महामंदीची तीव्रता आणखी वाढेल आणि त्यातून ब्रिक देशांना मोठ्या नुकसानीला सामोरे जावे लागेल.

नव जागतिक व्यवस्थेच्या दिशेने वाटचाल व्हावी या दृष्टीने आणखी एक महत्त्वपूर्ण मुद्दा ब्रिक शिखर परिषदेत हातळण्यात आला व तो म्हणजे संयुक्त राष्ट्र संघटनेत (UN) व्यापक सुधारणेचा. संयुक्त निवेदनाच्या चौदाव्या परिच्छेदात यासंदर्भात स्पष्ट भूमिका घेत भारत आणि ब्राझिलच्या आंतरराष्ट्रीय राजकारणातील सहभागाचे महत्त्व अधोरेखित करून युनोत महत्त्वपूर्ण भूमिका पार पाडण्यासाठी त्यांनी व्यक्त केलेल्यास अपेक्षा आम्ही समजतो व पूर्ण पाठिंबा देतो असे नि:संदिग्धपणे म्हटले आहे. युनोच्या संरचनेत सुधारणा करण्या संदर्भात राष्ट्र राज्यात मतभेद आहेत. सुधारणांचे स्वरूप काय असावे. त्यात कोणत्या घटकांचा समावेश असावा, मूल्यात्मक बदल केले जावेत काय आदीबाबत राज्यांत एकमत नाही. तसे असण्याचे काही कारण नाही; परंतु ज्या काळात आणि ज्या पार्श्वभूमीवर ती स्थापन झाली हे लक्षात घेतले असता ब्रिक राज्यांच्या अपेक्षांचे महत्त्व पटायला लागते.

युनोच्या स्थापनेला दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा संदर्भ आहे. त्यावेळी जग राजकीय व लष्करी दृष्ट्या दोन परस्परविरोधी अशा भिन्न गटात विचारधारेच्या आधारे विभागले होते. आंतरराष्ट्रीय व्यापार व भांडवली ओघ निम्न होता. विकसनशील राज्यांना जगाच्या बाजारपेठेत फारसे महत्त्व नव्हते.[६] पराभूत राज्यांना निर्णय प्रक्रियेत स्थान नव्हते. या स्थितीत आता मोठे बदल झाले आहेत. आज आपण २१ व्या शतकाच्या पहिल्या दशक समाप्तीच्या वाटेवर उभे आहोत. द्विध्रुवीयतेने बहुध्रुवीयतेचा मार्ग आता प्रशस्त केला आहे. विकसनशील राज्य केवळ सार्वभौमिकदृष्ट्याच स्वतंत्र नाहीत तर विविध वित्तीय संघटनांच्या माध्यमातून जागतिक बाजाराला आकार देण्या इतपत सामर्थ्यशाली झाली आहेत. व्यापार, वस्तू, सेवा यांच्या मुक्त वहनामुळे जग अधिकाधिक आंतरसंबंधीय (Interconnected) झाले आहे. ज्या प्रमाणात हे फेरबदल होत गेले त्या प्रमाणात युनो किंवा वित्तीय संस्थांच्या संरचनेत बदल झाले नाहीत. त्यांचे स्वरूप शीतयुद्धोत्तर काळातही एकाधिकारशाहीवादीच राहिले आहे. काळाची आव्हाने पेलण्याच्या अनुषंगाने बदलावा तितका बदल वा सुधारणा न झाल्यामुळे ब्रिक राज्याच्या मागणीत तथ्यांश आहे हे मान्य करावे लागते. आता राहिला प्रश्न तो म्हणजे ब्रिक राज्यांच्या न्याय्य अपेक्षांना मूर्त रूप देण्यासाठी आजच्या भांडवली व्यवस्थेत पुरेसा अवकाश आहे काय? कालसापेक्षतेत याचे उत्तर शोधावे लागते.

आजमितीला तरी अमेरिका व तिची मित्र राष्ट्रे युनोच्या संरचनेत व्यापक सुधारणा घडवून आणण्यास अनुकूल नाहीत. भारत आणि ब्राझिलचा सुरक्षा परिषदेत कायम सदस्यत्वासाठीच्या प्रवेशास जोपर्यंत अमेरिका अनुकूल असणार नाही तोपर्यंत ब्रिकच्या मागणीला मूर्त रूप येणार नाही हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. भारताच्या संदर्भात बोलायाचे झाले तर अमेरिकेचा पाठिंबा तीन घटकांनी प्रभावित झाला आहे. एक, भारताच्या अण्वस्त्रीकरणामुळे दक्षिण आशियात अण्वस्त्र स्पर्धा वाढीस लागली आहे असे आजही अमेरिकेचे मत आहे. दोन, अल–कायदाला संपविण्यात अमेरिकेला पाकिस्तानचे सहकार्य अपरिहार्य आहे आणि पाकचा भारताच्या सुरक्षा परिषद कायम सदस्यत्वासाठीच्या दाव्याला विरोध आहे. तीन, अलिकडे इतिहासाला मागे टाकून जवळपास सर्वच क्षेत्रात भारत–अमेरिका सहकार्य वृद्धिंगत होत आहे. यापैकी पहिले दोन घटक नकारात्मक आहेत तर तिसरा घटक सकारात्मकतेचे निदर्शक आहे. पहिल्या दोन घटकांवर तिसऱ्या घटकाची मात होईल अशी चिन्हे सद्यघडीला तरी दिसत नाहीत. ओबामा प्रशासनाचा भारताच्या परराष्ट्र धोरणासंदर्भात नेमका काय दृष्टिकोण आहे याचा अंदाज

अनुक्रमणिका

अद्यापही भारतीय परराष्ट्र मंत्रालयाला घेता आला नाही. यामुळे 'थांबा नि वाट पहा' या नीतिचा अवलंब सिंग प्रशासनाला करण्याशिवाय दुसरा पर्याय नाही.

युनोप्रमाणेच जागतिक वित्तीय संघटनांच्या सुधारणेचा मुद्दाही ब्रिक राज्यांनी कळीचा बनविला आहे. पाश्चिमात्त्यांचे प्रभुत्व असलेल्या ब्रेटन वूड्स संस्थांवर (IMF, IBRD) कमी-अधिक प्रमाणात प्रत्यक्ष हल्ला करीत विकसनशील राज्यांचा प्रभावी आवाज व पर्याप्त प्रतिनिधीत्व असले पाहिजे असे निग्रहपूर्वक म्हटले आहे. शिवाय या संस्थांच्या प्रमुखांची नियुक्ती खुली, पारदर्शक आणि गुणवत्ताधारित झाली पाहिजे अशी रास्त अपेक्षाही व्यक्त केली आहे.[७] याबाबत जी-२० लंडन परिषदेच्या ठरावाची ताबडतोब अंमलबजावणी झाली पाहिजे असे म्हटले आहे. जागतिक आर्थिक अरिष्टाच्या पार्श्वभूमीवर विकसनशील राज्यांना जी-२० च्या स्वरूपात चर्चेत सहभागी करून घेण्याचा विकसित देशांचा निर्णय एकीकडे स्वागतार्ह वाटावा पण दुसरीकडे यामुळे सर्व पेच सुटतील आणि वित्तीय संघटनांचे लोकतांत्रिकीकरण होईल अशी अपेक्षा ठेवणे गैर आहे. याचे कारण म्हणजे जागतिक म्हणविल्या जाणाऱ्या IMF, IBRD, WTO या वित्तीय संघटनावरील विकसित राष्ट्रांची पकड आजही घट्ट असून इतक्यात आपल्या हितसंबंधाविरोधी सुधारणेस ते तयार होतील असे वाटत नाही. या संस्थांना सर्वाधिक निधी पुरविणाऱ्या उद्योगप्रधान देशांचा मताधिकारातील हिस्साच त्यांना जागतिक बाजाराचे स्वानुकूल नियंत्रण व संचालन करण्यास पुरेसा आहे हे विसरता येणार नाही. केवळ आजच नाही तर १९८० च्या दशकापासून विकसित देश आपल्या हितसंबंधासाठी आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थांचा 'विकसनशील राष्ट्रांचा रचनात्मक विकास' या गोंडस नावाखाली वापर करीत आहेत हे सांगण्यास कोण्या ज्योतिषाची गरज नाही. अशा स्थितीत ब्रिक नव-जागतिक अर्थव्यवस्थेचा पाया रचेल असे सांगणे थोडेस धाडसाचेच ठरणार आहे.

वरील मुद्याव्यतिरिक्त इतरही काही समान वैश्विक हितसंबंधीय समस्यांवर ब्रिक परिषदेत चर्चा झाली जसे की, अन्न सुरक्षा, वातावरणातील बदल, ऊर्जा सुरक्षा, दहशतवादाला विरोध इत्यादी. यातील पहिल्या तीन समस्या परस्परसंबंधित असून मानवाने निसर्ग चक्रात केलेल्या अनिष्ट हस्तक्षेपामुळे निर्माण झाल्या आहेत. 'शाश्वत विकासाच्या' संकल्पनेवर जोपर्यंत विकसित व विकसनशील राष्ट्रांत एकमत व सहकार्य होत नाही तोपर्यंत या समस्यांवर मात करणे कठिण जाणार आहे. वातावरणातील बदलाच्या संदर्भात समान ध्येय परंतु भिन्न जबाबदारीच्या तत्त्वावर रचनात्मक संवादाची तयारी ब्रिक देशांनी दाखविली आहे ही समाधानाची बाब आहे. जागतिक अन्न सुरक्षाबाबत ब्रिक राज्यांनी स्वतंत्रपणे संयुक्त निवेदन करून बहुमुखी सहकार्याचे एक प्रकारे दालनच उघडले आहे. नजीकच्या काळात ऊर्जेचा प्रश्न जगाला खूप भेडसावणार आहे. विकसनशील राज्यांची ऊर्जाभूक प्रचंड असते. त्यामुळे पारंपारिक ऊर्जा स्रोतांबरोबरच अपारंपारिक ऊर्जा स्रोतांचा विकास ही अपरिहार्य बाब बनली आहे. एक अक्षय ऊर्जास्तोत्र म्हणून सौर ऊर्जेचा अधिकाधिक विकास आणि वापर झाला पाहिजे.

ब्रिक राज्यांनी सर्व प्रकारच्या दहशतवादाचा व त्याच्या आविष्काराचा निषेध केला आहे. ही बाब भारताच्या दृष्टीने जमेची आहे. परंतु आज गरज आहे ती इच्छाशक्तीची व सच्च्या कृतीची, अन्यथा सर्वच परिषदामधून नेहमीच दहशतवादाचा एकमुखाने निषेध केला जातो तसा ब्रिक परिषदेनेही केला या पलिकडे त्याला महत्त्व असणार नाही 'नेहमीची येतो मग पावसाळा' या उक्तीप्रमाणे न घडता दहशतवादाविरोधात ठोस कृतीची आज गरज आहे. साऱ्या जगाला ज्ञात आहे की जगातल्या दहशतवादाचे मूळ पाकिस्तान व अफगाणिस्तानात आहे. 'गुड तालिबान', 'बॅड तालिबान' ची भाषा शुद्ध दांभिकपणा आहे. परिषदे दरम्यान पाकचे अध्यक्ष झरदारींना डॉ. सिंग यांनी दहशतवादाच्या मुद्यावरून फटकारले हे एका अर्थाने चांगलेच झाले. मुंबईवरील दहशतवादी हल्ला आणि खुद्द पाकमध्ये वारंवार होत असलेल्या दहशतवादी हल्ल्यानंतर पाकने कठोर पावले उचलणे अगत्याचे झाले आहे. उभय देशातील संवादाचा मार्ग खुला करण्यासाठी








ते आवश्यक आहे. दहशतवादाचे मूळ निखंदून काढण्यासाठी अमेरिका, चीन, ब्रिटन आदी राज्यांना हितसंबंधीय राजकारणाच्या पलीकडे जाऊन कृती करावी लागणार आहे.

एकंदरीत, आर्थिक अरिष्टाच्या पार्श्वभूमीवर संपन्न झालेल्या ब्रिक राज्यांच्या परिषदेत अनेक मुद्द्यांवर चर्चा झाली. नव जागतिक व्यवस्थेचे स्वप्न साकार करण्याच्या दृष्टीने टाकलेले एक पाऊल म्हणूनच त्याचे मूल्यमापन करावे लागणार आहे; परंतु प्रश्न असा उपस्थित होतो की, त्यासाठी ब्रिक राज्यांकडे पुरेसे सामर्थ्य आहे काय? ग्लोबलाईज्ड विश्वात या परिषदेला काय भवितव्य आहे? नव जागतिक व्यवस्थेला आकार देण्यासाठी ब्रिक राज्यांनी अगोदर स्वयंपूर्ण झाले पाहिजे, जेणे करून निर्णय करण्याची स्वायतत्ता निर्माण होऊ शकेल. जगात नैसर्गिक संसाधने मर्यादित आहेत. ब्रिक राज्याकडेही ती मर्यादित आहेत; परंतु या देशांची ऊर्जेची भूक मात्र प्रचंड आहे. अर्थव्यवस्थेच्या गतिमानतेला आणखी तीव्र करण्यासाठी या देशांना अधिकच्या शिलकीसाठ्याच्या स्वरूपात ऊर्जा लागणार आहे. जोपर्यंत पुनर्निर्मितीक्षम ऊर्जा संसाधनाचा विकास या देशांत होणार नाही तोपर्यंत ब्रिक जगाला तारेल असे वाटत नाही. कारण कोणत्याही देशाच्या प्रगतीचा आणि प्रभाव क्षमतेचा मार्ग ऊर्जा स्वावलंबनातून जात असतो हे लक्षात घेतले पाहिजे.

ब्रिक राज्यांत चीनची भूमिका मध्यवर्ती असणार आहे. चारांत तोच एकमेव असा देश आहे की ज्याच्याकडे सर्वाधिक गंगाजळी आहे. विस्तृत बाजारपेठ आहे. अलीकडे तो अमेरिकेचा सर्वात मोठा व्यापारातील मित्र आहे. सुरक्षा परिषदेत त्याला नकाराधिकार आहे. या सर्व बाबी लक्षात घेतल्या तर ब्रिकच्या सर्वच निर्णयांना प्रभावित करण्याची क्षमता चीनची आहे हे निर्विवाद सत्य मान्य करावे लागते. इतिहास साक्षी आहे की रशिया-चीन किंवा चीन-भारत यात वर्चस्वाची नेहमीच स्पर्धा राहिली आहे. हितसंबंधीय राजकारणाच्या क्षेत्रात या देशांनी परस्परांवर कुरघोडी करण्याचा प्रयत्न केला आहे. सर्वाधिक गरज असणाच्या काळातही 'मॉस्को-पेकींग-दिल्ली' असा अक्ष या राज्यातील अंतर्गत मतभेदामुळे होऊ शकला नाही हे कसे विसरता येईल. चीन व रशियाच्या मानवी हक्क व लोकशाहीवरील अश्रद्धाही भविष्यात ब्रिकच्या मार्गात मोठी अडचण उत्पन्न करू शकतात. तैवानच्या संदर्भात आज हेच घडत आहे.

ब्राझिलच्या क्षमतेबद्दलही खात्री बाळगता येत नाही. सध्या कुठे या देशाला राजकीय व आर्थिक घडी नीट बसवण्यात यश मिळते आहे; परंतु याचा अर्थ तो पूर्ण स्वावलंबी झाला असा होत नाही. अजूनही देशांतर्गत असंतोष, बेकारी आदीवर या देशाला मात करावयाची आहे. भारतालाही स्वतःचे पुष्कळ प्रश्न आहेत. अंतर्गत असुरक्षा, बेरोजगार, भ्रष्टाचार देशाची पाठ सोडण्यास तयार नाही. पाकशी सौहार्दाचे संबंध निर्माण करण्यात सातत्याने अपयश येत आहे. याचा ताण भारताच्या तिजोरीवर येऊन निर्णयीकरण प्रभावित होत चालले आहे. प्रचंड लोकसंख्या ब्रिक देशांची डोकेदुखी आहे. कारण त्यातच सामाजिक, आर्थिक प्रश्नांचा उगम दडलेला आहे.

या सर्व अडथळ्यांना पार करत ब्रिकला मार्गक्रमण करावे लागणार आहे. शीतयुद्धोत्तर काळात रशियाने कात टाकली आहे ही एका बाजूने जमेची बाब आहे. शांघाय सहकार्य संघटन व ब्रिक परिषदेत रशिया ज्या आक्रमक पद्धतीने सामोरे आले त्यावरून हे सहज लक्षात येते. असे असले तरी रशियाचा पूर्वसुरीचा शत्रू पूर्ण खंगला आहे असे अनुमान काढता येत नाही. इराकनंतर अमेरिकी राजनयाचा बिंदू अफगाणिस्तान व इराणकडे सरकला आहे. या भागातील शक्तिशून्यता रशियाला पुनःश्च भरून काढावी लागणार आहे. अफ-पाक योजनेचे आव्हान रशियासमोर असणार आहे. एकीकडे भारताला युरेशियाच्या राजकीय व व्यापारविषयक आघाडीत सामील करावे लागले तर दुसरीकडे पाकचे भूराजकीय महत्त्वही रशियाला नाकारता येणार नाही. ही एक प्रकारे तारेवरची कसरतच असणार आहे. (अमेरिकासहित पाश्चिमात्त्य देशांचे प्रमुख भारताला भेट देऊन पाकिस्तानलाही जातात) यामुळेच रशियाने यंदा शांघाय सहकार्य संघटनेचा फॉरमॅट बदलत भारत, पाक, इराण, मंगोलिया या चार राज्यांना सहभागी होण्याचे निमंत्रण दिले होते की काय अशी

शंका येते. एकंदरीत विद्यमान आर्थिक अरिष्टाच्या पार्श्वभूमीवर ब्रिक परिषदेला नव-जागतिक व्यवस्थेला आकार देण्याची नामी संधी चालून आली आहे. यात ती कितपत यशस्वी होईल याचे वस्तुनिष्ठ उत्तर येणारा काळ देईल.

**संदर्भसूची :**

०१. Salman Ansari Javid (2009) : 'BRIC Summit Marks Frustration with Dollar' www.tehrantimes.com

०२. News Analysis : 'BRIC makes formal debut with first summit meeting' WWW.XINHUANET.COM

०३. कित्ता : (Salman Ansari Javid)

०४. Joint statement of the BRIC countries' Leaders, June 16, 2009-yekaterinbury, Russia.

०५. पूर्वोक्त : (Salman Ansari Javid)

०६. PM's vision of Emerging Power in 21st century' press Releases (7 July 2009) www.pib.nic.in/release

०७. Siddhartha Varadarajan (2009) : 'BRIC should create conditions for fairer world order' The Hindu 17.06.2009





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# बदलते राजकीय वास्तव आणि ग्रामीण कादंबरी

प्रा. डॉ. अरुण कृष्णा शिंदे

१

प्रस्तुत शोधनिबंधामध्ये १९८० नंतरचे राजकारणातील बदलते संदर्भ, नव्या राजकीय संस्कृतीचे आगमन, या सर्वांचा ग्रामीण समाजजीवनावर झालेला बहुस्तरीय परिणाम आणि या बदलत्या ग्रामीण राजकीय-सामाजिक वास्तवाचे आकलन १९८० नंतरच्या ग्रामीण कादंबरीमध्ये कसे चित्रित झाले आहे याचा शोध घेऊन काही निष्कर्ष नोंदविण्याचा प्रयत्न केला आहे. येथे 'ग्रामीण कादंबरी' ही संज्ञा व्यापक अर्थाने वापरली असून प्रामुख्याने अनागर कृषिजन समूह येथे अभिप्रेत. आहे. कृषिकेंद्रित व्यवस्थेमध्ये प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे जगणारा शेतकरी, मजूर, आलुते, बलुते, दलित, आदिवासी आदि श्रमिक कृषिजनसमूह केंद्रवर्ती असलेल्या साहित्याचा अंतर्भाव केला आहे.

२

साहित्य आणि समाज यांचा फार जवळचा अनुबंध आहे. साहित्याचा निर्माता लेखक हा समाजाचाच घटक असतो. त्याने निर्माण केलेले साहित्य मानवी समाजासाठीच असते. लेखकाची जडणघडण, अनुभव, निरीक्षण, मूल्य-दृष्टी, भाषा, शैली वगैरेंवर सामाजिक पर्यावरणाचा कळत नकळत मोठा प्रभाव पडत असतो. लेखकाचे जगणे व अनुभव हे सामाजिक संदर्भातच घडत असतात. समाजातही सतत काही ना काही घडामोडी घडत असतात. राजकीय, आर्थिक, धार्मिक घडामोडींचा सामाजिक संरचनेवर अंतःस्तरावर लोकांच्या मानसिकतेवर व जगण्याचा अनेक संदर्भावर विविध परिणाम होतात. तीव्र संवेदन, शोधकदृष्टी, सजग सामाजिक भान व मूल्यनिष्ठा असणाऱ्या लेखकास या बदलांची जाणीव होते. तो माणूस आणि समाज केंद्रस्थानी ठेवून भोवतालच्या वास्तवाचा, बदलांचा सर्व संदर्भासह अन्वयार्थ लावतो. वर्तमान आणि भविष्यासंदर्भात काही एक मूल्यविज्ञान करण्याचा प्रयत्न करीत असतो.

समाजाच्या विराट, जटील व्यामिश्रतेचा व्यापक पटावरून अर्थ लावणारा कादंबरी हा सशक्त वाङ्मय-प्रकार आहे. प्रदीर्घ भाषिक अवकाश, आशयसूत्रांचे अनेकविध पदर, विशाल सामाजिक आशय, अनेक पात्रे-प्रसंग, विस्तृत संरचना, आकृतिबंधाचा लवचिकपणा, खुलेपणा, या वैशिष्ट्यांमुळे[१] समाजाच्या विराट व्यामिश्रतेशी कादंबरी आपला संबंध सहज जुळवू शकते. समाजाशी सतत संबंध राखून असणारी कादंबरी, सामाजिक प्रक्रियेचा एक अत्यंत महत्त्वाचा घटक असलेल्या राजकारणाचे आकलन मांडण्यास सक्षम असते. राजकारणाशी संबद्ध असलेल्या विविध मूल्यांचा मानवी जाणिवेतील अनुभव साकार करण्याचा प्रयत्न करते.[२]

या पार्श्वभूमीवर १९८० नंतरचे बदलते राजकीय स्वरूप, त्याचा ग्रामीण जीवन-मानसिकतेवर झालेला परिणाम व या बदलत्या वास्तवाचा ग्रामीण कादंबरीने लावलेला मूल्यात्मक अन्वयार्थ यांचा अभ्यास करणे गरजेचे आहे.

३

१९८० नंतर राजकारणाचे स्वरूप फार झपाट्याने बदलले. त्याचे ग्रामीण समाजजीवनावर खोलवर दूरगामी परिणाम झाले आहेत. एकूणच या राजकीय-सामाजिक बदलांचे स्वरूप सूत्ररूपाने पुढीलप्रमाणे आहे –

१) १९७५ ची आणीबाणी, जनता सरकारचा फसलेला प्रयोग, महाराष्ट्रातील पु. लो. द सरकार, फोडाफोड, इंदिरा गांधींचे पुनरागमन, वगैरे घटनांचा राजकीय कार्य शैलीवर अत्यंत अनिष्ट परिणाम झाला. १९८० नंतर राजकारणातील लोककल्याणाची भावना, ध्येयवाद, राष्ट्रभक्ती, सेवाभाव, निःस्वार्थीपणा, त्याग वगैरे मूल्ये, आदर्शवाद, नैतिकता पार लयाला गेली. 'सत्ताप्राप्ती' हे साध्य मानून विधिनिषेध शून्य, भ्रष्ट, संधीसाधू सत्तापिपासू दांभिक राजकीय संस्कृती उदयाला येऊन प्रतिष्ठा पावली.

अनुक्रमणिका

सत्तेतून सामाजिक परिवर्तनाचा आशय मागे पडून व्यक्तिगत भोगविलास, संपत्तीचे केंद्रीकरण, पदाचा दुरुपयोग, भ्रष्ट विघातक घटकांचे संरक्षण-संवर्धन, भ्रष्टाचारांचे सार्वत्रिकीकरण, वगैरे माध्यमातून लोकशाहीच्या गोंडस नावाखाली सरंजामी मानसिकता व वतनदारी शोषकता निर्माण झाली. ही नवी राजकीय संस्कृती सर्वदूर ग्रामीण भागापर्यंत वेगाने पसरली व कार्यरत झाली.

२) पंचायत राज्यव्यवस्था, सत्तेच्या विकेंद्रीकरणातून निर्माण झालेली सत्तास्थाने, विविध सहकारी संस्था, सातत्याने होणाऱ्या निवडणुका यामुळे ग्रामीण भाग राजकीय दृष्ट्या कमालीचा जागरूक व संवेदनशील झाला आहे. ग्रामीण भागाने महाराष्ट्राला विविध क्षेत्रातील नेतृत्व दिले. परंतु १९८० नंतर याचा दुसरा एक अत्यंत विपरीत परिणाम घडला आहे. ग्रामीण भाग राजकारण ग्रस्त बनला आहे. राजकारणातील अपप्रवृत्ती जीवनाच्या सर्व अंगामध्ये शिरल्या आहेत. छोटी मोठी सत्तास्थाने, पदे, मताचा दर, पैशाची उधळपट्टी, दादागिरी, सत्तासंघर्ष पाडापाडी, भांडणतंटे, कोर्टकचेऱ्या सत्तास्थानांतून भ्रष्टाचार, लोकांची अडवणूक, शोषण आदींनी ग्रस्त ग्रामीण भागामध्ये लोकांना अशा राजकारणाची सवयच जडली आहे. घरटी पुढारी निर्माण होऊन कार्यकर्ते व नेत्यांची जमातच उदयास आली आहे व ती स्थानिक जनसमूहांचे शोषण करीत आहे.

३) समग्र राजकारणग्रस्ततेमुळे ग्रामीण कृषिजन संस्कृतीचा सर्व पातळ्यावर मूल्यऱ्हास व अधःपतन होत आहे. समूहभाव, उदारता, माणूसकी, विश्वास, सत्य, श्रमनिष्ठा, सहानुभाव, उदारता, निर्मळता, नीतिमत्ता, सच्चेपण, आदरभाव, जबाबदारीचे प्रखर भान यासारख्या कृषिजन संस्कृतीच्या मूल्यव्यवस्थेला राजकारणामुळे सुरूंग लागत आहे. कृषिजन समाज विस्कटत, भरकटत चालला आहे. सत्तालोलुपता, भ्रष्टता, दांभिकता, खोटी प्रतिष्ठा, दिखाऊपणा, खाबुगिरी, लोचटपणा, लाचारी, स्वार्थ, वैरभाव, उचापती, अविश्वास, जातीयता, फसवणूक, लुबाडणूक आदी अपप्रवृत्तींनी ग्रामीण समाजजीवनात थैमान घातले आहे. नैतिकता व समूहभाव हरवत झालेल्या कृषिजन संस्कृतीचे भवितव्य अंधःकारमय झाले आहे.

४) कृषिजन समूहांचे शोषण करणारा वर्ग ग्रामीण भागातूनच उदयास आला आहे. लोकशाही सत्तास्थानांमधील नेते व त्यांच्या कार्यकर्त्यांची 'जमात', सहकारी संस्थामधून स्वतःचे 'चांगभले' करून घेतलेले सहकार सम्राट व त्यांचा गोतावळा, सधन शेतकरी, ठेकेदार-कंत्राटदार, व्यापारी-दलाल, काळे धंदेवाले लोक, प्रचंड शोषक व ढोंगी शिक्षण सम्राट, भ्रष्ट व मग्रूर नोकरशाही, सावकार, वगैरे घटक गरीब, कष्टकरी कृषिजन-समूहांचे मनमानी शोषण करीत आहेत. त्यांची 'पॉवरफुल्ल लॉबी' दाबजोर पैसा, राजकीय लागेबांधी व दादागिरी यांच्यामुळे त्यांच्याविरूद्ध 'ब्र' काढण्याची कोणाची हिंमत नाही. राजकीय वरदहस्तामुळेच हा वर्ग फोफावला असून कृषिजन समूहांना 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' झाला आहे. हा वर्ग खराखुरा शोषक असून तो लोकांची घनघोर पिळवणूक नित्य करीत आहे.

५) १९९० मधील मंडल आयोगाची अंमलबजावणी, राखीव जागा विरोधी व समर्थनार्थ आंदोलने, सत्तेचे भान, यामुळे ओ. बी. सी. वर्गात अस्मिता जागृती व सत्तेचे राजकारण आकार घेत आहे. जातवार संघटना, महापुरुषांची वाटणी, जयंत्या-मयंत्यांचे दिखाऊ प्रसिद्धीप्रिय कार्यक्रम, नेत्यांची पोपटपंची, पदाधिकाऱ्यांचे पोस्टर्स, डिजिटल बोर्ड, कमिशनची वर्तमानपत्री समाजसेवा वगैरेंनी नवे अस्मिताकेंद्रित राजकारण बाधित झाले आहे. त्यामुळे वंचितांच्या जीवनमानात कसलाही फरक पडलेला नाही. वैचारिकतेचा व रचनात्मक कृतिशील ध्येयधोरणांचा सर्वंकष अभाव असणाऱ्या राजकारणाने गावे अधिकच प्रदूषित, बिघडत, जातीय होत चालली आहेत.

६) दलित राजकारणातील गटबाजी, सत्तास्पर्धा, भंपक नेते यामुळे दलित चळवळीत व गावागावातील कार्यकर्त्यांमध्ये फूट पडली आहे. श्रमिक दलित समाजाचा भ्रमनिरास झाला असून दलित राजकारणाची शोकांतिका झाली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांना कृतीची गांभीर्यपूर्ण जोड देण्याची वानवा आहे. जातिधिष्ठित, प्रसिद्धीप्रिय, सत्तालोलूप राजकारण केंद्रवर्ती झाले आहे. दलितांच्या ऐक्यातून सांघिक शक्तीचा उदय

होण्याऐवजी ते सवर्णांच्या 'फोडा आणि फसवा' नीतीचा बळी ठरत आहेत.

७) जातीय अस्मिता केंद्रित सत्तापिपासू राजकारणामुळे ग्रामीण भागात अनेक राजकीय पक्ष, त्यांचे कार्यकर्ते, असंख्य संघटना, मंडळे व त्यांचा तत्त्वशून्य गोंधळ यांनी धुडगूस घातला आहे. वैचारिक अधिष्ठान, तात्त्विक बैठक, रचनात्मक कृतिकार्यक्रम, ध्येयधोरण शिस्त, अंमलबजावणीतील गांभीर्य, सार्वजनिक चारित्र्य अशा अत्यंत महत्त्वपूर्ण बाबी कोणाच्या खिजगणतीतही नसतात. भावनिक व जातीय अस्मितेचे राजकारण करणाऱ्या पक्ष व संघटनांच्या हाती ग्रामीण युवक, बेकार मुले, व अन्य मंडळी आयतीच सापडल्यामुळे त्यांना भडकावून हिंसक, विध्वंसक आंदोलने व गैरकृत्ये करणे नित्याचे झाले आहे. महापुरुषांच्या नावाचा वापर करून राजकारण करणाऱ्या मंडळीकडून त्यांच्या विचारांची व महान कार्याची राजरोस हत्या सुरू आहे. एकंदरीत ग्रामीण मंडळी खोटी प्रतिष्ठा, पदे व भ्रष्ट मार्गाने काहीतरी मिळविण्याच्या वाढत्या लालसेमुळे 'हुरळली मेंढी लागली लांडग्यामागे' या न्यायाने प्रस्थापित शोषक राजकारणाचे भक्ष्य झाले आहेत. या सर्व गोष्टींचे अनेकविध गंभीर परिणाम सहजीवन व मूल्यभावाच्या उखडण्यामध्ये होत आहेत.

८) १९९० मधील राममंदिर आंदोलन, बाबरी मशिदीचा विध्वंस, दंगली, बॉम्बस्फोट, मूलतत्त्ववादी संघटनांचा उदय, प्रादेशिक पक्षांचे वाढते महत्त्व, यामधून धर्मवादी, भावनाकेंद्रित राजकारण फोफावले. ग्रामीण भागामध्येही कट्टरवादी सांस्कृतिक घटक कार्यरत झाले. धार्मिक विद्वेष व भावनिक राजकारण करण्याचे पद्धतशीर प्रयत्न होत आहेत. रंग, झेंडे, प्रार्थनास्थळे, पुतळे वगैरेंभोवती भावना जोडून माणसामाणसामध्ये वैरभाव पसरवला जात आहे.

९) १९९० नंतर बदलत्या राजकीय-आर्थिक स्थितीत धार्मिक, कट्टरपंथी मंडळीने राजकारणात प्रवेश केला. राजसत्ता, भांडवली अर्थसत्ता व धर्मसत्तेने एकत्र येऊन शोषणकारी व्यवस्था अधिकच बळकट केली. प्रसारमाध्यमांनी धार्मिक कार्यक्रम, प्रवचने, बाबा, बापू, माँ वगैरेंचा रतीब लावून लोकांची मानसिकता धर्मप्रवण, गुलाम, विचारशून्य बनविली. ग्रामीण भागात धार्मिक उत्सव, जत्रायात्रा, धार्मिक स्थळे, उरूस, अंधश्रद्धा, कीर्तन-प्रवचन, सत्संग, बैठका, बुवाबाजी, पानाडे वगैरेंना ऊत आला आहे. धार्मिक स्वातंत्र्याचा अतिरेक होऊन धर्मभाव व धर्मव्यवस्था अधिक बळकट होत आहे. परिणामी कृषिजन समूह धार्मिक, मानसिक गुलामगिरीमध्ये वेगाने जात आहे. धर्मसत्ता मानसिक गुलाम जनसमूहांचे निरंकुश शोषण करीत असते. गुलामांना आपले शोषण होतेय हेच मुळी कळत नसते. प्रस्थापित व्यवस्थेला हेच हवे असते. १९९० नंतरच्या धर्माधिष्ठित राजकारणामुळे व त्याअनुषंगाने धर्मव्यवस्थेच्या विविध घटकांच्या सक्रियतेने ग्रामीण कृषिजन समूह अशाप्रकारे शोषणाचा बळी ठरला आहे.

१०) संवैधानिक तरतुदीनुसार महिला, मागासवर्गीय घटकांना राजकीय सत्तेमध्ये राखीव जागांची तरतूद करून संधी देण्याचा प्रयत्न झाला. परंतु पारंपारिक सरंजामी मानसिकतेमुळे सत्तासूत्रे प्रस्थापित वर्गाच्या हाती नाना तंत्रे वापरून राहिली आहेत. महिला व दलित-आदिवासींच्या आत्मभानातून—स्वसामर्थ्यावरील राजकारण अजून खूप खूप दूर आहे. मात्र सध्या 'फार्स' उत्तम वठविला जात आहे. काही ठिकाणी या सत्तासंघर्षातून ताणतणाव निर्माण होत आहेत. त्याचे कौटुंबिक-राजकीय-सामाजिक परिणाम होत आहेत. एकूणच ग्रामीण राजकीय पटावरील बदलत्या सत्ता-केंद्रामुळे नव्या सत्तासंघर्षाबरोबरच एका दांभिक राजकीय संस्कृतीची सुरुवात झाली आहे.

११) सरकार, राजकीय पक्ष, नेते यांच्याकडून योजना/ अभियाने/ घोषणा/ विकासकामे वगैरेंचे पोकळ भाषणबाजीने नाटक केले जाते. 'कल्याणकारी' राज्य 'समता', बंधुता सामाजिक न्याय, समाजवाद वगैरे घटनात्मक उद्दिष्टांना हरताळ फासला गेला आहे. जागतिकीकरण खासगीकरणाच्या नावाखाली सरकार सार्वजनिक हिताच्या उपक्रमामधून अंग काढत आहे. त्यामुळे वंचित ग्रामीण कृषिजन समूह, आदिवासी, दलित, कारागिर, फिरस्ते यांचे जीवनमरणाचे प्रश्न उग्र बनले

अनुक्रमणिका

आहेत. शेतकरी फार मोठ्या संख्येने आत्महत्या करीत आहेत. खेडी उध्वस्त होत असून श्रमिक उपजीविकेसाठी महानगराकडे स्थलांतर करीत आहेत. महानगरातील झोपडपट्टी, गुन्हेगारी वाढीचे मूळ ग्रामीण बेकारी व दारिद्र्यामध्ये आहे.आदिवासींमध्ये किमान प्राथमिक गरजांचाही अभाव आहे. कुपोषण, अनारोग्य, दारिद्र्य, अंधश्रद्धा, निकृष्ट जीवनस्तर यांनी ग्रासले आहे. त्यांच्यासाठीच्या योजना राजकारणी दलाल व नोकरशाही फस्त करीत आहेत. या तीव्र आर्थिक विषमतेविरुद्धचा विद्रोह नक्षलवादांच्या रूपाने उदयास आला आहे. ग्रामीण कृषिजन समूहांच्या आर्थिक मागासलेपणाचे मूळ राजकीय-शोषक-दांभिक व्यवस्थेमध्ये आहे.

१२) सर्वक्षेत्रांचे राजकीयीकरण, सार्वत्रिक भ्रष्टता, नैतिकतेचे उच्चाटन हे समकालीन राजकीय वास्तव आहे. राजकीय-प्रशासकीय व्यवस्था आपल्या घटनात्मक जबाबदाऱ्यांना अव्हेरून प्रचंड भ्रष्टाचार व ढोंगबाजी करून लोकांना नागवित आहे. शिक्षण, सहकार, शेती, समाजकारण, प्रसारमाध्यमे, वगैरे सर्व क्षेत्रांवर राज-कारणाचा प्रभाव पडून तेथें अपप्रवृत्तींची लागण झाली आहे. त्यामुळे या व अन्य सामाजिक क्षेत्रांमधील मूलभूत विधायकता, रचनात्मकता, उद्दिष्टे व्यापकतेने विकसित होण्याऐवजी भ्रष्टतेने विकलांग होत आहेत. 'मूल्य-ऱ्हासाचे' परिणाम सर्व सामाजिक संरचनावर, अंत:स्तरावर पडत आहेत. त्यामुळे सामाजिक अध:पात वेगाने होत असून लोकांचा राजकीय व्यवस्थेवरील विश्वास उडाला आहे. वि. का. राजवाडे यांनी 'महिकावतीची बखर' च्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे-'गेल्या तीन हजार वर्षात हिंदुस्थानात जी देशी आणि परदेशी सरकारे होऊन गेली, ती सर्व प्रकारच्या पोटभरू चोरांची झाली. व सरकार म्हणजे उपटसुंभ चोरांची टोळी, अशी गावकऱ्यांची अंत:स्थ प्रामाणिक समजूत आहे.'[३] हे आजसुद्धा ग्रामीण राजकीय वास्तव आहे.

१९८० नंतरच्या अशा मूल्यहीन, भ्रष्ट, व्यामिश्र, जटिल, विस्कटत चाललेल्या राजकीय सामाजिक वास्तवाचे प्रतिबिंब ग्रामीण कादंबरीमध्ये कसे पडले आहे हे अभ्यासणे आपल्या वाङ्मयीन संस्कृतीचे राजकीय आकलन, सजग सामाजिक भान व मूल्यगर्भ सर्जनशोधाच्या दृष्टीने आवश्यक आहे.

४

१९८० नंतरच्या ग्रामीण कादंबरीमध्ये बदलत्या राजकीय स्थितीच्या, संदर्भांच्या ग्रामीण सामाजिक विविधांगी परिणामांचे चित्रण पुढीलप्रमाणे झालेले आढळते.

रंगनाथ पठारे यांची 'ताम्रपट' ही १९९४ साली प्रकाशित झालेली महत्त्वपूर्ण कादंबरी. राजकारणातील मूल्य-ऱ्हास केंद्रवर्ती असणाऱ्या या कादंबरीमध्ये स्वातंत्र्योत्तर काळातील बदलत्या राजकीय संस्कृतीचे व्यापक सामाजिक पटावरून चित्रण केलेले आहे. १९४२ ते १९७९ या प्रदीर्घ कालखंडात सत्तेच्या संकल्पनेत क्रमाक्रमाने झालेले परिवर्तन, जुन्या, नि:स्वार्थी तत्त्वनिष्ठ पिढीचे राजकारणाबाहेर फेकले जाणे व नव्या भ्रष्ट,ढोंगी, धनदांडग्यांची झुंडशाही प्रस्थापित होणे या मूल्य-ऱ्हासाचा, दोन पिढ्यांमधील बदलांचा, कलात्मक वेध घेतला आहे. सत्तास्पर्धा, विविध विचारसरणींच्या तात्त्विक भूमिकांमधील बदल, स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर पिढीच्या विचार आचारामधील फरक, सहकार चळवळ, शिक्षण संस्थामधील राजकारण, दलितांचे प्रश्न, सत्तेचे-मतांचे राजकारण, समाजाच्या विविध स्तरांमध्ये झालेली जागृती व त्यामधून निर्माण झालेले प्रश्न अशा व्यापक पटावरून राजकीय-सामाजिक संक्रमणाचे व्यापक कालावकाशातून समर्थपणे चित्रण केले आहे. १९४२ च्या स्वातंत्र्य-लढ्यापासून विविध कालखंडात घडलेल्या महत्त्वपूर्ण घटना प्रसंगांचा, स्थित्यंतरांचा, नाना प्रवृत्तीच्या व्यक्तिरेखा, लहान मोठे प्रसंग, गतिमान कालपट साकारणारी प्रवाही निवेदनशैली यांच्या माध्यमातून सर्जनशील आविष्कार केला आहे. अहमदनगर जिल्ह्याच्या पार्श्वभूमीवर साकारलेली ही कादंबरी तिच्यातील व्यापक राजकीय-सामाजिक वास्तव संदर्भामुळे, मूलभूत राजकीय प्रवृत्तींच्या तटस्थ चित्रणामुळे आणि व्यापक सामाजिक जाणिवामुळे तत्कालीन महाराष्ट्रातील राजकारणाचे प्रतिनिधित्व करते. राजकारणाच्या विविध संदर्भांचे गंभीर वाङ्मयीन आकलन मांडणारी 'ताम्रपट' सामाजिक दस्तऐवजाचे

रूप धारण करते व राजकीय कादंबरीचा एक मौलिक टप्पा ठरते.

बदलती राजकीय संस्कृती व आधुनिकीकरणाच्या आगमनामुळे ग्रामीण भागात 'इंडिया' अवतीर्ण झाला. या बदलाचे ग्रामजीवनावरील बहुस्तरीय परिणामांचे मार्मिक, लक्षवेधी, ढंगदार शैलीतून चित्रण पुरुषोत्तम बोरकर यांनी 'मेड इन इंडिया' (१९८७) मध्ये केले आहे. आधुनिकतेच्या स्पर्शाने व बदलत्या राजकीय कल्पनामुळे ग्रामजीवनातील प्रदूषण, मूल्यांची पडझड, यांचे मिस्किल, उपरोधिक परंतु विचारप्रवर्तक चित्रण बोरकरांनी केले आहे. प्रयोगशील निवेदनशैलीच्या या कादंबरीने रूपाची, भाषेची आणि सामाजिक आशयसूत्रांच्या मांडणीची वेगळी जाणीव दाखविली आहे. वऱ्हाडी बोली, म्हणी, वाक्प्रचार, आंग्लाळलेली भाषा वगैरेंचा समुचित उपदेश करून लेखकाने एक अस्सल कलाकृती निर्माण केली आहे. कादंबरीच्या अखेरीस नायक गावातल्या तळागाळातल्या माणसांच्या सुखदुःखाशी जोडून घेतो. गावातल्या कष्टाकऱ्यांचं दुःख त्याचं दुःख बनतं. शेवटी मृत्यूनंतर आपली रक्षाही या मातीशी एकरूप व्हावी व फुलापिकातून फुलावी अशी मनिषा तो बाळगतो. 'शहर' व 'खेडी' यांची स्वानुभवाने तुलना करून 'इंडिया' आणि 'भारत' या दोन समाजवास्तवामधला भेदही दाखवितो. शहर कशी जळवासारखं खेड्याचं शोषण करतात हेही दाखवितो. एकूणच शहरी आधुनिकतेविरुद्ध देशी जाणिवेचा ठळक आविष्कार 'मेड इन इंडिया' मध्ये झाला आहे हा नितीन रिंढे यांचा अभिप्राय या कादंबरीचे मौलिकत्व व देशीपण विशद करणारा आहे.[४]

समकालीन राजकीय सामाजिक जीवनातील मूल्यभ्रष्टता, दिशाहीनता, जातीयता, ताणतणाव यांचा अन्वयार्थ लावणारी कादंबरी म्हणजे तणकट (१९९८). राजन गवस यांनी समकालीन राजकीय घडामोडी, सामाजिक चळवळी व विविध समाज गटातील जागृतीमुळे ग्रामीण कृषिजन समाजाच्या अंतःस्तरामध्ये होत असलेल्या बदलांचा शोध घेतला आहे. वाढत्या जातीय जाणिवा, अस्मितांचे राजकारण, दलित चळवळीमधील रचनात्मकतेचा ऱ्हास, नेत्यांचा वांझ भंपकपणा, नवशिक्षित दलित पिढीचे गावापासूनचे व रक्ताच्या माणसांपासूनचे तुटलेपण, अर्धशिक्षित तरुणांची अविचारी आक्रमकता, दलितांतर्गत उच्चनीचता, श्रेष्ठ-कनिष्ठतेचे क्षुद्र डावपेच, दलित नेत्यांची विकाऊ प्रसिद्धिलोलुपता सामाजिक उत्तरदायित्वाच्या भावनेचा अभाव, मूल्यभ्रष्टता, शिक्षण क्षेत्रातील जातीयता, दलितांच्या शिष्यवृत्त्या व राखीव जागा संदर्भात सवर्णांची मानसिकता, आडनावे बदलणे, खोट्या केसेस घालणे यामागील डावपेच. डॉ. आंबेडकरांना मूळापासून गंभीरपणे समजून घेण्याच्या भावनेचा अभाव, जातीय तणावांचे दुष्परिणाम, मोर्चे, चळवळी यांमधील भाकडपण व प्रसिद्धीचे राजकारण, गरिबांच्या योजना लाटून 'कुऱ्हाडीचे दांडे गोतास काळ' झालेले नेते, 'जशास तसे' उत्तर देण्याची वाढती प्रवृत्ती व तिचे परिणाम अशा अनेकविध आशयसूत्रांच्या मधून व्यामिश्र, संवेदनशील सामाजिक वास्तवाचा, त्यामधील बारकाव्यांचा, परस्परसंबंधाचा व परिणामांचा एक व्यापक आलेख 'तणकट'मध्ये साकारला आहे. दलित चळवळीच्या आजच्या रूपाचे मूल्यमापन गवस यांनी केले आहे. मोठा वैचारिक आवाका असणारी व गुंतागुंतीच्या सामाजिक वास्तवाचे बहुविध पदर उलगडणारी ही गंभीर वाङ्मयीन कलाकृती सामाजिक दस्तऐवज म्हणून उपयुक्त ठरते. कृषिजन संस्कृतीतील माणसांची मनोरचना, गावगाड्याचे परस्परावलंबित्व, ग्रामजीवनातील अंतःस्तर समजून घेतल्याशिवाय जातीय तणाव निवळणार नाहीत असा वेगळा समूहभावाचा रचनात्मक विचार या कादंबरीतून व्यक्त झाला आहे. गवस यांना ग्रामव्यवस्थेच्या रचनेची व कृषिजन समूहांच्या मानसिकतेची सूक्ष्म व सखोल जाण आहे. अनुभवसिद्ध निरीक्षण व चिंतनशीलतेमधून ते गावाच्या जगण्याची 'नस' शोधतात. जातीयता निर्मूलनासाठी मध्यमवर्गीय ब्राह्मणी क्रांतीचे जाहिरनामे, घोषणा, मोर्चे, उपोषण, चळवळ वगैरेंचा फोलपणा ते दाखवितात. महारवाडा मातीला जवळचा आहे. त्याची सगळी मूळं खेड्यातल्या जमिनीत आहेत. तो जुन्या पुराण्या परंपरेच्या भिंती मोडून सारे उखडून देऊन स्वतःच्या हिमतीवर तगेल. तगणे आणि नव्या स्वरूपात तरारुन येणे हा कृषिसंस्कृतीचा अद्वितीय वारसा आहे. कृषिजन

परंपरेतील समूहभाव जपत, साऱ्या जाती-जमातीशी संवादी राहत, शोषित साऱ्याच समूहांना बरोबर घेऊन परिवर्तनाची नवी दिशा घेऊन पुढे जाण्याची देशी जाणीव गवस व्यक्त करतात.

गावपातळीवरील राजकारणाचे स्वरूप 'धिंगाणा' मध्ये राजन गवस यांनी रेखाटले आहे. ग्रामीण राजकारण्यांचे वर्तन, सत्तास्पर्धा, गटतट, मक्तेदारी, वैरभाव, भांडणतंटे, ग्रामपंचायतीचा कारभार, दूध डेअरी, तरुण पिढीची घुसमट व प्रस्थापितांना आव्हान देण्याची तयारी, ताणतणाव, संघर्ष, निवडणुका आदींच्या चित्रणातून ग्रामीण राजकारणाचा खालवलेला स्तर व त्याचा गरीब कष्टकऱ्यांवरील परिणामाचे दर्शन गवस यांनी घडवले आहे.

महिलांना राजकीय सत्तेतून सक्षमीकरणासाठी राखीव जागांचे धोरण अंमलात आले. महिला विविध पदावर निवडूनही आल्या. परंतु सत्तेची सूत्रे त्यांच्या पतीच्या हातीच राहतात. ग्रामीण भागातील पुरुषप्रधान मानसिकता व स्त्रीचे दुय्यमत्व यामुळे स्त्रीराजकारणाची शोकांतिका होत आहे. रा. रं. बोराडे यांनी 'आमदार सौभाग्यवती' (१९८९) व 'नामदार श्रीमती' या कादंबऱ्यामध्ये ग्रामीण भागात नेतृत्व करू पाहणाऱ्या स्त्रीची खुद्द तिच्या पतीकडून केली जाणारी कोंडी, तिचे दुय्यमत्व, या सत्तासंघर्षामध्ये पुरुषप्रधान मानसिकता कशी डिवचली जाते आणि स्त्रीचे कर्तृत्व/राजकारण संपविण्याचे कसे प्रयत्न होतात यांचे नेटके चित्रण केलेले आढळते. लिंगात्मक भेदभावाचे दुष्ट राजकीय रूप बोराडे यांनी दाखवून दिले आहे.

नागनाथ कोत्तापल्ले यांनी 'उलट चालिला प्रवाहो' (१९८५) मधून खेडेगावातील वर्णजातिप्रधान राजकारण, संधीसाधू पुढारी, लोकांच्या जगण्याच्या बदललेल्या कल्पना, प्रामाणिक कार्यकर्त्यांची कुचंबणा व प्रवाहाबाहेर फेकले जाणे अशा सुप्त कार्यरत घटकांचा शोध घेतला आहे. 'गांधारीचे डोळे' (१९८५) मध्ये त्यांनी राजकारणाचे हिडीस रूप व त्यामागील सामाजिक जाणिवांचे बेगडीपण उघडकीस आणले आहे. रामचंद्र पठारे यांनी 'पाचर' (१९८९) मध्ये स्वातंत्र्योत्तर काळात ग्रामीण भागात झालेले बदल, उच्चवर्णीय परंपरावाद्यांचे राजकारणावरील वर्चस्व, दलित पँथर, तसेच दलितांच्यामधील बदलामुळे पारंपरिक ग्राममनाला बसणारे धक्के, मतांसाठीचे दिखाऊ पुरोगामीपण परंतु कृतीच्या वेळी पितळ उघड पडणे अशा ग्रामीण मानसिकतेचा आडवा छेद घेतला आहे. मोहन पाटील यांनी 'लिगाड' आणि 'खांदेपालट' (१९९०) मधून धनदांडग्यांचा हाती एकटवलेले ग्रामीण सरंजामी राजकारण, धनदांडग्यांनी गरिबांसाठीच्या विकास योजनांचा घेतलेला लाभ, वंचितांची होरपळ, घराणेशाही, राजकीय अपरिहार्यतेतून सत्तेची 'खांदेपालट' करण्याची वेळ आल्यास ती अनुकूल, फायदेशीर करण्याची व्यूहरचना, या धनदांडग्यांना विरोध करणे म्हणजे 'लिगाड'मागे लावून घेण्यासारखे आहे या मानसिकतेतून त्यांच्या हीन कृत्याकडे डोळेझाक करण्याची लोकांची मनोवृत्ती. एकूणच धनदांडग्यांचे अर्थकारण, भ्रष्ट राजकारण, सामान्यांची भयभीतता, फरफट, विस्कटत जाणे, समूहभाव, पारंपरिकता यांचा लोप होऊन माणसामाणसात वाढत चाललेले अंतर यांचे नेमके वास्तव दर्शन घडविले आहे. विजय शिरसट यांनी 'कुस्ती' आणि 'काळगर्भ'मध्ये ग्रामीण दलितांर्गत संघर्ष, वैमनस्य, गटबाजी, त्याचा फायदा घेण्याची सवर्ण मानसिकता, वाद व या सगळ्यातून दलितांच्या होणाऱ्या शोषणाचे प्रत्ययकारी दर्शन घडवले आहे.

दलित राजकीय चळवळीचे मूल्यमापन करणारी 'तणकट' परंपरेतील महत्त्वाची आणखी एक कादंबरी म्हणजे जी. के. ऐनापुरे यांची 'अभिसरण'. समकालीन दलित राजकारणातील विविध प्रवाह, नेते, गट-तट, त्यांची सत्तास्पर्धा, मूल्यहीनता, सत्तेसाठी चळवळ मोडीत काढण्याची सत्तालोलुपता, व्यभिचारी निष्ठा, लाचारी, दिशाहीनता, वगैरेमुळे दलित राजकारण व चळवळीचे कसे वाटोळे झाले आहे याचे भेदक, वास्तवदर्शी चित्रण ऐनापुरे यांनी केले आहे. 'परिवर्तन चळवळीला वांझ ठरविणाऱ्या असंख्य संधीसाधू पुढाऱ्यांना अर्पण केलेली ही कलाकृती वाचकाला अस्वस्थ व अंतर्मुख करते. दलित समाज व दलित चळवळीला आस्थेने समजून घेऊन वर्तमान विघटनाचा, दारुण अवस्थेचा अन्वयार्थ लावून विकसनाच्या दिशा सूचित केल्या आहेत. दलितांच्या

राजकारण प्रवेशामुळे निर्माण झालेल्या सत्तासंघर्षावर 'सभापती', 'पाटीलकी' या कादंबऱ्या प्रकाश टाकतात. राखीव जागामुळे निवडून आलेल्या दलितांना सत्तास्थानावर विराजमान होता आले असले तरी त्यांना नामधारी बनवून सत्तेची दोरी आपल्याच हाती ठेवण्याचे प्रस्थापित सवर्णांचे राजकारण योगिराज वाघमारे यांनी 'सभापती' मधून उलगडून दाखविले आहे. ग्रामीण समाजमनात खोलवर रुजलेल्या जातीयतेमुळे व सत्तास्थानावरील सरंजामी मालकीतत्त्वामुळे दलितांच्या राजकारणाची होणारी शोकांतिका दर्शविणारी ही कादंबरी राजकारणातील विविध वृत्ती – प्रवृत्ती, डावपेच, कुटिल कारस्थाने व विविधांगी परिणामांची चर्चा करते. असाच 'आशय' बाबाराव मुसळे यांच्या 'पाटीलकी'मध्ये आला आहे. पाटील, सरपंचाच्या जागा आरक्षित झाल्यावर ग्रामीण सत्ताकारणाने घेतलेले वेगळे वळण, सत्तेवर गुळाचा गणपती बसवून सत्तेची चव चाखण्याची उच्चवर्णीयांची प्रवृत्ती, या गुळाच्या गणपतीला आत्मभान आले, त्याच्या ठिकाणचा 'स्व' आणि 'स्वाभिमान' जागा झाला तर निर्माण होणारा सत्तासंघर्ष या बदलत्या ग्रामीण राजकीय वास्तवाचे प्रतिबिंब 'पाटीलकी'मध्ये पडले आहे. या कादंबरीमध्ये ग्रामीण सामाजिक संरचनेचे बहुविध संदर्भही प्रकट झाले आहेत. ग्रामीण भागातील शोषणाचा--आर्थिक, शारीरिक स्तर, भूकेचा संदर्भ, स्त्रीजीवन वास्तवाचे विविध पैलू, उच्चजातींची खालच्या वर्गाकडे पाहण्याची दृष्टी, गरीब व कनिष्ठ वर्गावरील अन्याय–अत्याचार, अंधश्रद्धा, भाऊबंदकी, कावेबाजपणा, बेरकीपणा अशी अनेकविध परिमाणे उलगडणारी ही कलाकृती बदलत्या सत्ताकारणामुळे ग्रामीण अंतर्गत संरचनेमध्ये होत असलेली मोडतोड, उलाघाल व विविध मानवी वृत्ती–प्रवृत्तींचे दर्शन घडवते.

आपल्या जातीपुरता विचार करणाऱ्या संकुचित राजकीय नेतृत्वाचे चित्रण 'भिरुड' (२००७) मध्ये गणेश आवटे यांनी केले आहे. ग्रामीण भागात स्थापन झालेल्या अनेक जातवार संघटना, त्यांचे राजकारण, गटबाजी, जातीय तणाव, दोन्ही गटांमध्ये दलित व सवर्णांचा सहभाग, त्यामुळे शोषक व शोषितांमधील खऱ्या संघर्षाचे वास्तव, गावगाड्याची मानसिकता, नव्या पिढीतही जातीयतेची लागण अशा अनेक बाबीवर कादंबरी प्रकाश टाकते. समकालीन ग्रामीण राजकारणाचे वास्तव टिपणारी आणखी एक समर्थ कलाकृती म्हणजे 'रौंदाळा' (२००८). कृष्णात खोत यांनी ग्रामीण राजकारणातील बदलते वास्तव बारकावे, तपशील, वृत्ती–प्रवृत्ती, मूल्यऱ्हास, भ्रष्टता, विद्रूपता, जातीय–धार्मिक स्तर, कुरुपता, डावपेच, सत्तासंघर्ष, भ्रष्टाचार असे राजकारणग्रस्त झालेले ग्राम-जीवन उलगडले आहे.

राजकीय संदर्भांचे समाजाच्या विविध अंगावर परिणाम होत असतात. राजकीय व्यवस्थेचे। राजकीय निर्णय प्रक्रियेचे। राजकीय प्रशासकीय कार्यतत्त्वांचे समाजाच्या एखाद्या अंगावर झालेल्या परिणामांचे चित्रण काही कादंबऱ्यामधून झालेले आढळते. अशा कादंबऱ्या-मधून बहुधा एखाद्या समस्येचे राजकीय अंग। राजकीय संदर्भ तत्त्व प्रकट केलेले असते. ग्रामीण महाराष्ट्राच्या अर्थकारणाचा कायापालट करणाऱ्या सहकार चळवळी-मधील राजकारणाचे, भ्रष्टाचाराचे चित्रण वासुदेव मुलाटे यांच्या 'विषवृक्षाच्या मूळ्या'मधून आले आहे. साखर कारखानदारीतील राजकारण मोहन पाटील यांच्या 'साखर पेरा'मध्ये येते. राजकीय व्यवस्थेचे आर्थिक निर्णय, शेतकऱ्यांच्या जीवन–मरणाच्या प्रश्नांकडे दुर्लक्ष, जागतिकीकरणाचे संदर्भ, त्यामागील राजकीय निर्णय प्रक्रिया, राजकीय व्यवस्थेकडून शेतीमालाच्या हमीभावाची टाळाटाळ, शेतकऱ्यांच्या आत्महत्या अशा कृषिजन समूहांच्या दुःख, द्रारिद्रय व आत्महत्याशी निगडित राजकीय संदर्भाचे, प्रशासकीय व्यवस्थेच्या भूमिकेचे अत्यंत प्रत्ययकारी चित्रण 'बारोमास'मध्ये येते. शेतकऱ्यांच्या वाताहातीस राजकीय व्यवस्था कशी जबाबदार आहे हे विविध संदर्भांनी स्पष्ट होते. राजकीय व्यवस्थेने शेतकऱ्यांच्याकडे कशाप्रकारे दुर्लक्ष केल्यामुळे शेतकरी उध्वस्त होत आहे; याचे दर्शन पाडा (अशोक कौतिक कोळी), अंधार इथला संपत नाही (भालचंद्र देशपांडे), बुझ्र्वागमन (दिनकर चौधरी) यासारख्या कादंबऱ्यामधून घडते. राजकीय व्यवस्थेने स्वीकारलेले जागतिकीकरण, खासगीकरण, नवभांडलशाही प्रधान अर्थव्यवस्था, त्यातून निर्माण झालेले विविध प्रश्न, त्यांमधील राजकीय–प्रशासकीय व्यवस्थेची भूमिका या सर्वांचा कृषिजन.

समूहावर झालेल्या भल्याबुऱ्या परिणामांचा शोध घेण्याचा प्रयत्न कादंबरीकारांनी केलेला आहे. राजकारणाचा, अर्थकारणाचा अन्वय शोधून ग्रामीण वास्तवाचे आकलन मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. राजकीय निर्णय प्रक्रियेमधून आलेले व शासकीय-प्रशासकीय सक्रिय भूमिकेने साकारणारे सेझसारखे प्रकल्प त्यांचे अंतरंग विस्थापित कृषिजन समूहांचे प्रश्न शंकर सखाराम यांनी एस्. ई. झेड्. या कादंबरीमधून मांडले आहेत. धरणबांधण्याच्या राजकीय निर्णयाचे धरणग्रस्तांच्यावरील मरणप्राय परिणाम, पुनर्वसनाचे राजकारण, धरणग्रस्तांचे प्रश्न, राजकीय पक्ष, नेते, प्रशासन यांच्या भूमिका या सर्वांचा व्यापक पटावरून विश्वास पाटील यांनी 'झाडाझडती'मध्ये वेध घेतला आहे. राजकीय निर्णयामुळे आणि एकूणच राजकीय प्रशासकीय कार्यसंस्कृतीमुळे कृषिजन संस्कृतीचे भवितव्य कसे धोक्यात येत आहे याचे दर्शन 'बारोमास', 'झाडाझडती', 'एस. ई. झेड्' यासारख्या कादंबऱ्या घडवितात. राजकीय व्यवस्थेने आदिवासींच्याकडे केलेले अक्षम्य दुर्लक्ष, त्यांच्यासाठीच्या योजनांमधील भ्रष्टाचार, राजसत्तेची दमनशक्ती, तीव्र आर्थिक विषमता, प्राथमिक मानवी किमान सुविधांचाही अभाव, शोषकांची साखळी यासारख्या घटकांमधून आदिवासी समाजामध्ये निर्माण झालेल्या प्रश्नांचे, समस्यांचे चित्रण 'एनकाऊंटर' (एकनाथ साळवे), 'एका नक्षल-वाद्याचा जन्म' (विलास मनोहर), भूक (शंकर सखाराम) यासारख्या कादंबऱ्यामध्ये केलेले आहे. आदिवासींच्या दुर्दशेला, दु:खदैन्याला व समस्यांना आपली राजकीय व्यवस्थाच पहिल्यांदा जबाबदार आहे. स्वातंत्र्यानंतर त्यांच्यापर्यंत काय पोचले? त्यांना किती मिळाले याला जबाबदार कोण? यासारखे व्यवस्थेला पिंजऱ्यात उभे करणारे प्रश्न या कादंबऱ्या उपस्थित करतात. म्हणून या कादंबऱ्या वंचित कृषिजन समूहांच्या मुक्तीला मुखर करण्याच्या दृष्टीने वाचकाला अंतर्मुख करतात. हेच त्यांचे मौलिकत्व व यश आहे.

राजकीय निर्णयांचा, प्रशासकीय कार्यसंस्कृतीचा ग्रामीण संदर्भाने विचार करणे आवश्यक आहे ही नवी दृष्टी 'निशाणी डावा अंगठा' (२००५) ही कादंबरी देते. रमेश इंगळे उत्रादकरांनी राजकीय-प्रशासकीय कार्य-संस्कृतीमध्ये फोफावलेल्या दांभिकतेचा, सोंगा-ढोंगांचा, उपरोधिक नर्मविनोदी शैलीतून दंभस्फोट केला आहे. सरकारने मोठा गाजावाजा करून सुरू केलेल्या प्रौढ साक्षरता अभियानाचा नोकरशाही कसा बोऱ्या वाजवते व खोटे कागदी काळे-पांढरे घोडे नाचवून जिल्हा साक्षरतेचे राष्ट्रीय पारितोषिक कशी पटकावते याचे खुमासदार वर्णन करून दांभिक राजकीय-प्रशासकीय व्यवस्थेची उपहासात्मक रीतीने चिरफाड केलेली आहे. सरकारी अभियाने कृषिजन समूहांच्या मानसिकतेचा, जीवनशैली व परंपरांचा विचार करून भूमिनिष्ठ तळमळीने राबविण्याची गरज सूचित केली आहे. योगिराज वाघमारे यांनी 'शिक्षणनामा' (२००४) मध्ये शिक्षणाचे झालेले राजकीयीकरण, बाजारीकरण, शिक्षणक्षेत्रातील अपप्रवृत्ती, भ्रष्टाचार, विकृती, विनाअनुदान शिक्षकांचे हाल व या सर्वांच्या मूळाशी असणारे राजकीय तत्त्व यांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे.

साहित्यिक आणि सांस्कृतिक चळवळी आता ग्रामीण भागापर्यंत पोहचल्या आहेत. साहित्यिक-सांस्कृतिक क्षेत्रातील राजकारणाचे दर्शन 'रथ' (रंगनाथ पठारे) 'कळप' (राजन गवस) या कादंबऱ्यामधून घडते.

अशाप्रकारे बदलत्या राजकीय वास्तवाचे व राजकीय व्यवस्थेच्या कार्यशैलीचे, प्रभावाचे प्रतिबिंब १९८० नंतरच्या मराठी ग्रामीण कादंबरीमध्ये पडलेले आढळते.

### ५

वरील विवेचनाच्या आधारे आपल्या हाती काही निष्कर्ष येतात. ते पुढीलप्रमाणे –

१) १९८० नंतर महाराष्ट्राच्या विविध भौगोलिक प्रदेशातील, छोट्या-मोठ्या गावातील नवे लेखक स्वानुभवाने आपली भाषिक प्रतिक्रिया व्यक्त करताना दिसतात. चित्रणक्षेत्र, अनुभवविश्व, भाषिक वैविध्य, आशयसूत्रे यांचा व्यापक विस्तार झालेला दिसतो. त्यामुळे बदलत्या राजकीय वास्तवाचे महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातील विविध भौगोलिक-सामाजिक स्तरांमधील बदलांचे प्रतिबिंब कादंबरीमधून उमटलेले आहे.








२) १९८० नंतरच्या कादंबरीमध्ये बदलत्या राजकीय वास्तवाचा ग्रामीण श्रमिक कृषिजन समूहांवर विविधांगी झालेल्या परिणामांचा शोध घेण्याचा गंभीर प्रयत्न लेखकांनी केला आहे. राजकारणाची बदलती संकल्पना, नवी राजकीय संस्कृती, बदलत्या प्रवृत्ती, जुन्या नव्या पिढीमधील मूल्यसंघर्ष व फरक, वेगाने होत असलेला मूल्य ऱ्हास विचारधारा, जबाबदारी यांचा नव्या राजकीय कार्यशैलीमध्ये लोप, सत्ता-संपत्ती-भोगविलास-शोषण, दांभिकता, भ्रष्टता, कुरूपता वगैरे सर्व प्रकारच्या अनिष्ट तत्त्वांचे नव्या राजकीय संस्कृतीमधील केंद्रीकरण, या सर्व घटकांचा ग्रामीण कृषिजनसमूहावर पडलेला बहुस्तरीय परिणाम, यांचा वेध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. एकूणच, बदलत्या राजकीय संदर्भाची परिणती 'सार्वत्रिक व सामाजिक मूल्यऱ्हासामध्ये कशी वेगाने होत आहे याचा अन्वय लावून विविध सामाजिक अंगोपांगावर, व्यक्तींच्या विचार-आचारावर व 'समूह' म्हणून असणाऱ्या भावबंधावर किती दूरगामी विपरीत परिणाम होत आहेत या ज्वलंत समस्येचे विविध पदर उकलण्याचा प्रयत्न केला आहे. सजग सामाजिक भान असणाऱ्या कोणालाही वर्तमान ग्रामीण राजकीय वास्तव अस्वस्थ करते, विस्कटणाऱ्या कृषिजन समूहांच्या भवितव्याबद्दल गंभीर प्रश्न निर्माण करते. या प्रश्नांशी भिडण्याचा प्रयत्न कादंबरीकारांनी केलेला आढळतो. यादृष्टीने 'ताम्रपट', 'मेड इन इंडिया', 'तणकट', 'अभिसरण', 'रौंदाळा', 'आमदार सौभाग्यवती', 'लिगाड' आणि 'खांदेपालट' यासारख्या कादंबऱ्या महत्त्वपूर्ण आहेत.'

३) व्यापक काळभान ठेवून विविध राजकीय संदर्भांचे, घटनांचे, बदलांचे, प्रवाहांचे, त्यांच्यामधील परस्परसंबंधाचे चित्रण करून बदलत्या राजकीय वास्तवाबाबत काही एक मूल्यात्मक विधान करण्याचा प्रयत्न 'ताम्रपट' मधून झाला आहे. व्यापक-सामाजिक-राजकीय पट व प्रदीर्घ कालावकाश कवेत घेऊन राजकारणाचा शोध घेणाऱ्या 'ताम्रपट'ने, दाखविलेल्या वाटेवरून ग्रामीण कादंबरी पुढे गेलेली नाही. ही एक मोठी मर्यादा आहे. 'ताम्रपट'मध्ये १९४२ ते १९७९ या कालखंडातील चित्रण येते. १९८० नंतर राजकारणाचे संदर्भ प्रचंड बदलले आहेत. त्यांचे फार गुंतागुंतीचे भलेबुरे परिणाम जीवनाच्या अनेक क्षेत्रावर होत आहेत. त्यांचा अन्वयार्थ लावून कलात्मक मांडणी करण्याचे मोठे आव्हान ग्रामीण कादंबरीकारासमोर आहे.

४) बदलत्या राजकीय, सामाजिक संस्कृतीचे ग्रामीण समूहजीवनावर, अंतरंगावर, विविध जातीजमातींच्यावर, लोकांच्या मानसिकतेवर, अंतःस्तरामध्ये कोणकोणते परिणाम, का व कसे होत आहेत, त्यांमधून कोणते नवीन प्रश्न निर्माण होत आहेत व त्यांना कसे सामोरे जायचे यांचा कृषिजन संस्कृतीच्या संदर्भाने अन्वयार्थ लावण्याचा नवा दृष्टिकोण 'तणकट'ने दिला आहे. समकालीन राजकीय सामाजिक चळवळींचे भूमिनिष्ठ जाणिवेतून मूल्यमापन करण्याचा विचार गवस यांनी मांडलेला आहे. ग्रामीण समूहभाव टिकण्याच्या दृष्टीने तो आवश्यक आहे. जी. के. ऐनापुरेंनी 'अभिसरण' मध्ये दलित चळवळीचे याच दृष्टीने मूल्यमापन केलेले आहे. 'तणकट'ने दाखविलेल्या गंभीर अन्वेषक मूल्यदृष्टीने कृषिजन समूहांचे अंतरंग उलगडणे व समकालीन राजकीय वास्तवाचा विविध संदर्भासह अन्वयार्थ लावणे या दृष्टीने ग्रामीण कादंबरीचा विकास झाल्यास परिवर्तनाच्या शक्यता निर्माण होतील असे वाटते.

५) १९८० नंतर राजकारणाने जीवनाची सर्व क्षेत्रे व्यापली आहेत. राजकारण एक प्रवृत्ती म्हणून सर्व क्षेत्रांमध्ये कार्यरत आहे. त्यामुळे विविध क्षेत्रामध्ये निर्माण झालेल्या समस्यांचे चित्रण अद्याप ग्रामीण कादंबरीमध्ये झालेले नाही. शिक्षण, सहकारासारख्या अत्यंत महत्त्वाच्या क्षेत्रावरील राजकीय प्रभावांचे चित्रण समग्रतेने झालेलेच नाही. दलित, आदिवासी, भटक्या जमाती यांचे बदलत्या राजकीय सामाजिक वास्तवामध्ये स्थान काय याचा शोध केव्हा घेणार? हा खरा प्रश्न आहे. स्त्रियांच्या राजकारणातील संघर्षाचे चित्रण एखाद्या दुसऱ्या कादंबरी-मधून येते. तेही पुरुष लेखकांनी केले आहे. स्त्री कादंबरीकार नाहीत. ग्रामीण पुरुषप्रधान समाजव्यवस्था, वर्णजातस्त्रीदास्य, स्त्रीचे दुय्यमत्व, पारंपरिक मानसिकता यांमुळेच ग्रामीण स्त्रियांची सर्जनशीलता आणि राजकारण या दोहोंचीही वाताहत झाली आहे. बदलत्या राजकीय, आर्थिक-जागतिक संदर्भामध्ये या प्रश्नांच्या मूळाशी कसे भिडणार व त्यांचे निराकरण कसे करणार हा सध्याच्या सजग सामाजिक भान असणाऱ्या चिंतनशील लेखकां-

समोरचा कळीचा प्रश्न आहे. कृषिजन समूहांच्या जीवन वास्तवाचे सर्वस्तरीय आकलन व्यक्त करणारे कादंबरीकार हवे आहेत.

६) १९८० नंतर राजकीय वास्तवाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या संख्येने अल्प आहेत. कदाचित अपुरे राजकीय आकलन व समाजापासून तुटलेपण यासारखी काही कारणेही त्यासंदर्भात देता येतील. काळाचे समग्र भान, स्थानिकपासून राष्ट्रीय, जागतिक राजकारणाचे-अर्थकारणाचे व्यापक संदर्भ, धर्मांध राजकारणाचा उदय, धर्मसत्ता, राजसत्ता व भांडवली अर्थसत्तेच्या भागीदारीतून उदयास आलेली शोषकतत्त्वे, विविध उपव्यवस्थांमधील राजकीय प्रभाव व त्यामुळे निर्माण झालेल्या शोषकप्रवृत्ती, वर्णवर्गजातस्त्रीदास्य, अभूतपूर्व मूल्यऱ्हास, विविध क्षेत्रांतील राजकारण व त्यातून उद्‌भवणारे प्रश्न, राजकारणग्रस्त ग्रामीणजन समूहांचे सर्वंकष विस्कटलेपण, शोषकांची नवी रूपे-नवा वर्ग अशा अक्राळविक्राळ वर्तमानाचे आव्हान आजच्या लेखकांसमोर आहे. या महाकाय अमूर्त शोषणकारी व्यवस्थेमध्ये वंचित, गरीब श्रमिक कृषिजन समूह कसा जगणार! आपली मूल्ये, स्वत्व, भाषा, ज्ञानपरंपरा, संस्कृती, माणुसकी, समूहभाव टिकवून कसा तग धरणार? त्याचे अस्तित्व आणि भवितव्य काय? यांचा सर्जनशोध घेऊन मूल्यात्मक आविष्कार करण्याचे आव्हान ग्रामीण कादंबरीकारासमोर आहे. यामधूनच कदाचित मराठीतील उदयाचा द्रष्टा कादंबरीकार जन्माला येईल असे वाटते.

७) १९८० नंतरची राजकीय वास्तवाचे आकलन मांडणारी कादंबरी गुणात्मक दृष्ट्या सकस आहे. १९८० नंतर मराठीमध्ये महत्त्वपूर्ण ठरलेल्या तसेच भारतीय पातळीवर पोहचलेल्या कादंबऱ्यामध्ये या काळातील ग्रामीण कादंबरी लक्षणीय ठरली आहे. याशिवाय 'मेड इन इंडिया'ने भाषेचे निवेदनशैलीचे नवे तंत्र दिले. 'निशाणी डावा अंगठा'ने उपहासगर्भ नर्मविनोदी शैलीतून राजकीय-प्रशासकीय कार्यसंस्कृतीचा दंभस्फोट करण्याचे सामर्थ्य दाखविले. परंतु हे थोडेफार अपवाद वगळल्यास प्रयोगशीलता फारशी आढळत नाही. रूपबंध, निवेदन, भाषा, शैली, यामध्ये नवे प्रयोग होणे गरजेचे आहे. यामुळे ग्रामीण कादंबरीच्या विकसनाच्या शक्यता खुल्या होतील असे वाटते.

**संदर्भ :–**

१. नेमाडे भालचंद्र (२००१), टीकास्वयंवर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद पृ. २५३.
२. थोरात हरिश्चंद्र (२००६), कादंबरीविषयी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे पृ. १९९-२०१.
३. जोशी लक्ष्मणशास्त्री (सं)(२००१), राजवाडे लेखसंग्रह, साहित्य अकादमी, नवी दिल्ली पृ. १५६.
४. रिंढे नितीन (२००६), समकालीन मराठी साहित्यातील देशी जाणिवा; ऐवजी, (अनियतकालिक) नोव्हेंबर २००६ पृ. ३४.
५. गवस राजन (२००२), तणकट, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृ. २३८.

**संदर्भग्रंथ –**

१. ठाकूर रवींद्र (१९९३) – मराठी ग्रामीण कादंबरी, मेहता पब्लिसिंग हाऊस, पुणे.
२. नेमाडे भालचंद्र (२००१) – टीकास्वयंवर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
३. खोले विलास (सं)(२००२) – गेल्या अर्ध-शतकातील मराठी कादंबरी, लोकवाङ्मयगृह, मुंबई.
४. नलगे चंद्रकुमार (सं)(१९९६) – ग्रामीण वाङ्मयाचा इतिहास, सुरेश एजन्सी, पुणे.
५. थोरात हरिश्चंद्र (२००६) – कादंबरीविषयी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
६. पाटील मोहन (२००२) – ग्रामीण साहित्य आणि संस्कृती, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद.
७. प्रदक्षिणा खंड दुसरा (२००४) – कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
८. शहा मृणालिनी, टिळक विद्यागौरी (संपा)(२००७) – आधुनिक मराठी साहित्य आणि सामाजिकता, पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
९. कोत्तापल्ले नागनाथ व इतर (संपा)(२००७) – साहित्य आणि समाज, प्रतिमा प्रकाशन, पुणे.






१०. मेश्राम केशव व इतर (संपा)(२००७) – वाङ्‌मयीन प्रवृत्ती : तत्त्वशोध, प्रतिमा प्रकाशन, पुणे.

११. यादव आनंद (२००१) – १९६० नंतरची सामाजिक स्थिती आणि साहित्यातील नवे प्रवाह, मेहता पब्लिसिंग हाऊस, पुणे.

१२. इंगोले कृष्णा (२००५) – गावजागर, माणगंगा प्रकाशन, सांगोला.

१३. उपरोक्त कादंबऱ्या.

१४. जोशी लक्ष्मणशास्त्री (संपा)(२००१) – राजवाडे लेखसंग्रह, साहित्य अकादमी, नवी दिल्ली.

**संदर्भ नियतकालिके : –**

१. समाज प्रबोधन पत्रिका

२. अक्षरवैदर्भी

३. महाराष्ट्र साहित्य पत्रिका

४. ऐवजी (अनियतकालिक)

यमुना व विनायक यांचे लग्न होऊन यमुना सासरी





**काल, आज आणि उद्या**

निअँडरतालची स्थिती

— साक्षी

उत्क्रान्तीचा सिद्धान्त मांडणारा विख्यात शास्त्रज्ञ चार्लस् डार्विन याच्या जन्माला या वर्षीच्या फेब्रुवारीत दोनशे वर्षे पूर्ण झाली. त्याचा महत्त्वाचा ग्रंथ जो 'दी ओरिजिन ऑफ स्पेसीज् बाय मीन्स ऑफ सिलेक्शन', तो नोव्हेंबर १८५९ मध्ये प्रसिद्ध झाला. म्हणजे त्या ग्रंथाच्या प्रकाशनाला आणखी दोन महिन्यांनी दीडशे वर्षे होतील. या ग्रंथाने व उत्क्रांतीच्या सिद्धान्ताने प्राणिशास्त्राला प्रगतीची एक नवीन दिशा दाखवून दिलीच पण धर्म, नीती, राजकारण, तत्त्वज्ञान इ. क्षेत्रातील पंडितांनाही आपापल्या विषयातील मूलभूत संकल्पनांचा पुनर्विचार करण्याची प्रेरणा दिली. महाराष्ट्रातील तत्कालीन विचारवंतांपर्यंत उत्क्रान्तीचा सिद्धान्त पोचला तो हर्बर्ट स्पेन्सर (१८२०-१९०३) या विद्वानाच्या ग्रंथांद्वारे. त्याच्या ग्रंथांची मराठी भाषांतरे ना. ल. फडके, (महर्षी) धों. के. कर्वे, चिं.ग. भानू अशा लोकांनी केली. महाराष्ट्रातील विचारकांच्या एका पिढीवर स्पेन्सरच्या ग्रंथांचा व परोक्षपणे डार्विनचा मोठा प्रभाव पडला होता.

उत्क्रान्तीच्या सिद्धान्तील महत्त्वाची संकल्पना 'नॅचरल सिलेक्शन' म्हणजेच 'निसर्गाने केलेली निवड' ही होय. डार्विनने आपल्या ग्रंथाच्या नावातच या संकल्पनेचा समावेश केला यावरून त्याच्या सिद्धान्ताच्या केंद्रस्थानी ही संकल्पना होती, हे स्पष्ट होते. डार्विनने म्हटले होते '(नैसर्गिक बदलांशी जुळवून घेण्यासाठी ) प्राण्याच्या गुणधर्मांत जे सूक्ष्म बदल होतात त्यांपैकी उपयुक्त बदल जतन केले जातात. यामागे जे तत्त्व आहे त्याला मी निसर्गाने केलेली निवड असे म्हटले आहे.' 'निसर्गाने केलेली निवड' या संकल्पनेची गुंतागुंत बहुतेक तपशिलांसह वेधकपणे ज्या उदाहरणातून समोर येते ते उदाहरण म्हणजे 'निअँडरताल' या मानवसदृश प्राण्याची अस्तित्व व समाप्तीची कथा.

(१)

जर्मनीतील डयुसेलडॉर्फ शहराजवळील निअँडर नावाच्या भागातील चुन्याच्या खाणीत ऑगस्ट १८५६ मध्ये काही हाडे सापडली. कार्ल प्युहरलॉट व हेरमान शाफ हाउसेन या दोन शास्त्रज्ञांनी त्या हाडांचा अभ्यास करून असा निष्कर्ष काढला की, हाडे एका मानवसदृश प्राण्याची आहेत. मनुष्याशी (किंवा आधुनिक मनुष्याशी) हा प्राणी फार मिळता जुळता असला पाहिजे. त्यानंतर ह्याच प्राण्याची हाडे युरोपात व पश्चिम आशियात अनेक ठिकाणी सापडली व या प्राण्याविषयी निरनिराळ्या उपपत्ती मांडण्यात येऊ लागल्या. काही विद्वान म्हणू लागले की हा प्राणी म्हणजे आधुनिक मानवाचा (होमो सेपियान्) पूर्वज असला पाहिजे; तर इतर अभ्यासक सांगू लागले की, हा निराळ्या जातीचा प्राणी होता.

निअँडरताल व आधुनिक मनुष्य यांच्यात खूपच साम्य होते. निअँडरतालची कवटी आणि माणसाची कवटी यांचा आकार बहुतेक सारखाच होता. तो माणसासारखाच ताठ उभा राहात असे; त्याचा बांधा भक्कम होता आणि दंड आणि हात सुदृढ होते. त्यांनी घडवलेली हत्यारे धारदार चांगली घडविलेली असत. ते दागिने तयार करीत. निअँडरताल हे युरोपात राहात होते व आधुनिक मनुष्य आफ्रिकेतून युरोपात पोचल्यानंतरही काही हजार वर्षे अस्तित्वात होते. म्हणजे आधुनिक मनुष्य आणि निअँडरताल यांची परस्परांशी गाठ पडली होती. त्यामुळेच अनेक प्रश्न उद्‌भवतात. एक म्हणजे, निअँडरतालला आधुनिक मानवाने तर नष्ट केले नाही ना? मनुष्य व निअँडरताल यांचा संकर झाला होता काय? जर माणसाने निअँडरतालचा उच्छेद केला नसेल तर ते नाहीसे कशामुळे झाले? प्रतिकूल नैसर्गिक बदलांमुळे तर ते नाहीसे झाले नसतील? समजा तसे झाले असेल, तर त्याच प्रतिकूल स्थितीत मनुष्य कसा तगून राहिला? माणसाच्या या चिवटपणामुळेच त्याला प्राणिजातींच्या समूहात विशेष स्थान मिळालेले नाही ना?

माणसाने निअँडरतालना नाहीसे केले या तर्काला फारसा आधार मिळत नाही. सुमारे चाळीस हजार वर्षांपूर्वी

मनुष्य युरोपात पोचला. त्यानंतरही जवळ जवळ पंधरा हजार वर्षे निअँडरताल अस्तित्वात होता. त्यामुळे युरोपियनांनी अमेरिकेतील आदिमानवाला जसे काही शतकातच नष्ट केले तसा प्रकार इथे झाला नाही. असे दिसते की, सुमारे अठ्ठावीस हजार वर्षांपूर्वीपर्यंत जिब्राल्टरच्या जवळपास निअँडरताल राहात होते. त्याच्या आधी काही हजार वर्षे युरोपातून ते नाहीसे झाले होते. सुमारे दोन लाख वर्षे निअँडरताल अस्तित्वात होते. निसर्गातील अनेक घडामोडींना तोंड देत ते तगून राहिले होते. म्हणजे निसर्गाच्या निवडीतून ते तावून सुलाखून बाहेर पडले होते. मग असे काय झाले की, ते पूर्णपणे लुप्त होऊन गेले व त्यांचे अस्तित्व सांगणारी काही हत्यारे व शेकोटीत जळलेल्या लाकडांचे कोळसे फक्त उरले?

निअँडरतालच्या जनुकाचा पुरेसा अभ्यास झालेला नाही. त्यामुळे मनुष्य व निअँडरताल यांचा संकर झाला होता की नाही, हे नक्की सांगता येत नाही. निअँडरतालच्या अस्थि-अवशेषांच्या तपासणीवरच, अजून तरी, अभ्यासकांचे निष्कर्ष आधारलेले आहेत.

(२)

अतिप्राचीन काळातील हवामानाचा जो अभ्यास झाला त्यावरून निअँडरतालांच्या नष्ट होण्यावर प्रकाश पडू शकतो. हिमयुगे व दोन हिमयुगांच्या दरमान्यचा सौम्य हवामानाचा काळ अशा दोन्ही हवामानांचा अनुभव निअँडरताल या प्राणिजातीला होता, हे अभ्यासकांना माहीत होते. तथापि ६५,००० वर्षांपूर्वीपासून २५,००० वर्षांपूर्वीपर्यंतच्या चाळीस हजार वर्षांच्या काळात हवामानात विचित्र बदल झाले. या कालखंडाला 'ओआय् एस्-३' असे तांत्रिक नाव आहे. आजवर अभ्यासकांची समजूत अशी होती की, 'ओआय् एस्-३' या कालखंडाच्या सुरुवातीला युरोपात सौम्य व सुखशीतल हवामान होते. जसाजसा काळ पुढे गेला तसे हवामान अधिक थंड होत गेले; व शेवटी संपूर्ण उत्तर युरोप बर्फाखाली झाकला गेला. ज्या अर्थी 'ओआय् एस्-३' च्या सुरुवातीला युरोपात निअँडरताल हे एकमेव मनुष्य सदृश प्राणी होते व त्या युगाच्या शेवटी तेथे फक्त आधुनिक मानवाच्या अस्तित्वाचा आढळ होतो, त्या अर्थी ह्या भयंकर थंडीमुळे निअँडरताल मरून गेले; त्यांना अन्न-वस्त्रे मिळेनाशी होऊन उपासमारीने काकडून मेले, असा कयास होता. पण या युक्तीवादात गोम अशी होती की, 'ओआय् एस्-३' या कालखंडातील हिमयुगाच्या पूर्वीही हिमयुगे आली होती व त्यातून निअँडरताल बचावून निघाले होते.

निअँडरताल या प्राण्याच्या शरीराची ठेवण व त्याचा जीवनक्रम थंड हवेला तोंड द्यायला तो समर्थ होता असेच दर्शवितो. निअँडरतालची छाती चांगली रुंद आणि पुष्ट होती; हात-पाय बळकट व सुदृढ होते. त्यामुळे त्याच्या शरीरातील ऊब तो धरून ठेवीत असे. थंडी फारच वाढली तर त्याला जनावरांची कातडी शरीरावर लपेटून घ्यावी लागत असतील इतकेच. त्या काळात अंगावर लोकर असणारे गेंडे युरोपात बर्फाने झाकलेल्या प्रदेशातून हिंडत असत. एकट्या-दुकट्या गेंड्याला गाठून त्याची शिकार करण्याला उपयोगी पडेल अशीच निअँडर-तालची शरीर यष्टी होती. यावरून हे स्पष्ट होते की, ओआय्एस-३ या काळात आलेल्या हिमयुगाने मरून जावे इतके लेचेपेचे निअँडरताल नव्हते. तेव्हा या हिमयुगात काही तरी विशेष असावे की, ज्यामुळे निअँडरताल नाहीसे झाले; किंवा हवामानामुळे निअँडरताल संपले हा युक्तिवाद सोडून दिला पाहिजे.

'ओआय्एस-३' या काळातील हवामानाचा आणखी अभ्यास केल्यावर त्या हिमयुगाचे काही बारकावे तज्ज्ञांच्या ध्यानात आले व त्या हिमयुगाचे जे सरधोपट वर्णन वर दिले आहे, ते सोडून द्यावे लागले. सौम्य उष्णतामानापासून हिमयुगापर्यंत हवामान अधिकाधिक थंड होत गेले पण हे होताना हवामानाने अनेकदा पलटी खाल्ली. हवामानातील या प्रत्येक हेलकाव्याबरोबर पर्यावरणात मूलभूत बदल होत असत. जंगले नाहीशी होऊन तेथे कुरणे वाढत; लोकरवाले गेंडे जाऊन तेथे रेनडिअर वावरू लागत. हे बदल इतक्या झपाट्याने होत की, एका निअँडरताल व्यक्तीला, ज्या वनस्पतींच्या व प्राणि-जातींच्या समवेत तिचे बालपण गेले त्या वनस्पती व प्राणी नष्ट झालेले आहेत व तारुण्यात आल्यावर आपण

निराळ्याच वनस्पती व प्राणी जाती पाहात आहोत, असा अनुभव येई. नंतर लगेच हवामान बदले व गाडे मूळपदावर येई.

तज्ज्ञांना असे वाटते की, सतत वाढत गेलेल्या थंडीमुळे निअँडरताल नाहीसे झाले हे म्हणणे बरोबर नाही. पर्यावरणातील या हेलकाव्यांशी जुळवून घेण्याइतकी सवड न मिळाल्याने निअँडरताल नष्ट झाले. उदा. जंगले नाहीशी होऊन फक्त कुरणे उरली तर झाडामागे दडून व आसपास फिरणाऱ्या लोकरवाल्या गेंड्यावर हल्ला करून शिकार मिळविण्याची निअँडरतालची रीत निरुपयोगी होई. तगून राहायचे असेल तर निअँडरतालला शिकारीची नवी रीत घटवावी लागे. पण तेवढी सवडच मिळत नसे. हवामान लगेचच बदले. निअँडरतालांच्या काही टोळ्यांनी नवीन परिस्थितीशी जुळवून घेण्याचा प्रयत्न केला होता, असे त्यांची निराळी हत्यारे व त्यांनी शिकार केलेले निराळे प्राणी यावरून दिसून येते. पण बरेच निअँडरताल मरून गेले असले पाहिजेत आणि उरलेले निअँडरताल अन्नाच्या शोधात आणखी विखुरले गेले असावेत. शेवटी निअँडरतालांची इतकी फाटाफूट झाली असावी की, पूर्वीच्या हिमयुगांनंतर ज्याप्रमाणे त्यांची पैदास वाढत असे तशी 'ओआयएस-३' च्या हिमयुगानंतर वाढली नाही आणि ते संपून गेले.

(३)

'आधुनिक माणूस युरोपात पोचल्यानंतरच निअँडरताल नाहीसे झाले' यावरून निअँडरतालांच्या नाहीसे होण्याला मनुष्यप्राण्याचा हातभार लागला असावा, असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. याचा अर्थ असा नाही की, मनुष्याने निअँडरतालांचा साक्षात् संहार केला. असे झाले असणार की, जे काही भक्ष्य उपलब्ध होते ते आपल्या पदरात पाडून घेण्यासाठी माणूस व निअँडरताल यांच्यात चढाओढ होऊन निअँडरतालांची पीछेहाट झाली असेल. या चढाओढीत निअँडरतालांवर मनुष्याने मात करण्यात माणसाला त्याच्या कोणत्या गुणधर्मांचा उपयोग झाला असेल हे नक्की सांगता येत नाही.

एक कयास असा आहे की, मनुष्य कोणतेही प्राणी वा वनस्पती यांच्यावर निर्वाह करण्यास तयार होता; या उलट निअँडरतालांपैकी काही टोळ्यांना मात्र लोकरवाल्या गेंड्यांसारख्या मोठ्या सस्तन प्राण्यांवरच गुजराण करता येई व असे प्राणी तुलनेने कमी होते. मनुष्य युरोपात आल्यावर तो इतर प्राणी व वनस्पती यांच्याखेरीज मोठ्या सस्तन प्राण्यांचीही शिकार करू लागला. साहजिकच निअँडरतालांच्या पोटावर माणसाचा पाय आला! निअँडरतालांची जीवनपद्धती ठरून गेलेली होती व जोपर्यंत मनुष्याशी स्पर्धा करण्याची पाळी त्यांच्यावर आली नव्हती, तोपर्यंत ते साऱ्या प्रदेशाचे राजे होते. मनुष्य आफ्रिकेतील विषुववृत्तीय प्रदेशात वाढला व तेथून टप्प्याटप्प्याने युरोपात पोचला. नवीन पर्यावरणाशी जुळवून घेण्याची माणसाची हातोटी काही वेगळीच होती. असे दिसते की, ज्ञान संपादण्याची चतुराई माणसापाशी ज्या प्रमाणात होती तेवढ्या प्रमाणात निअँडरतालापाशी नव्हती. निअँडरताल मठ्ठ होते व माणसाशी चाललेल्या स्पर्धेत ते पराभूत होणार असे ठरलेलेच होते, असा बऱ्याच शास्त्रज्ञांचा तर्क आहे.

तथापि असेही पुराव्यानिशी दाखविता येते की, आपण समजतो तितके निअँडरताल निर्बुद्ध नसावेत. जी कौशल्ये केवळ माणसालाच शक्य आहेत असे मानले जात होते त्यापैकी बरीच कौशल्ये निअँडरताललाही अवगत होती. त्यामुळे मनुष्य व निअँडरताल यांच्यातील भेद बराच पुसट होत चालला आहे. जिब्राल्टर भागात निअँडरतालांची शेवटची वस्ती होती हे आपण वर नमूद केले आहे. या वस्तीचा अधिक शोध घेतला असता असे आढळले आहे की, येथील निअँडरताल प्राणी मासे मारून खात व पक्षी आणि ससे यांचीही शिकार करीत. म्हणजे मोठ्या सस्तन प्राण्यांच्या शिकारीवरच त्यांची उपजीविका चाले. हे म्हणणे खरे नाही. एकटा माणूसच मासेमारी किंवा पक्ष्यांची शिकार यात वाकबगार होता असे नाही. जर्मनीत असे एक ठिकाण सापडले आहे की, तेथे ३६ ते ४० हजार वर्षांपूर्वी निअँडरतालची वस्ती होती तर ३३ ते ३६ हजार वर्षांपूर्वी मनुष्यवस्ती होती. तेथे सापडलेली निअँडरतालांची हत्यारे व नंतरची मनुष्याची हत्यारे यांचा तुलनात्मक अभ्यास केला तेव्हा असे आढळले की, मनुष्याची हत्यारे जास्त विविध

प्रकारांची आहेत खरी पण निअँडरताल व मनुष्य यांच्या कृती (ॲक्टिव्हिटीज्) व कार्यपद्धती बहुतेक सारख्याच होत्या.

झाडांच्या डिंकाचा उपयोग करून दगडी पाती लाकडी मुठींना चिकटवणे, तीक्ष्ण टोक असणारी दगडी हत्यारे भक्ष्य प्राण्यांच्या शरीरात भोसकणे किंवा प्राण्यांच्या अंगावर फेकून मारणे, हाडे व लाकडे यांच्यापासून हत्यारे बनविणे या कृती निअँडरताल करीत व त्याच नंतर तिथे आलेला मनुष्यही करीत असे. निअँडरतालच्या हत्यारात मनुष्याच्या हत्यारांपेक्षा विविधता कमी का, याचे उत्तर देताना (निअँडरतालचे पक्षपाती) शास्त्रज्ञ सांगतात की, जर उपलब्ध हत्यारांवर निअँडरतालाचे भागत असेल, तर त्यांनी निराळी हत्यारे का बनवावीत?

आजवर अशी समजूत होती की, निअँडरतालांपाशी भाषा नव्हती. भाषा म्हणजे काय, तर चिन्हांच्या किंवा खाणाखुणांच्या माध्यमातून दळणवळण साधणे. अनेक निअँडरताल व्यक्ती आपल्या शरीरावर रंगरंगाटी करीत व दागिनेही घालत. यावरून त्यांना अर्थवाहनांसाठी चिन्हांचा उपयोग करता येतो, याची कल्पना होती असे वाटते. आपण वर म्हटले आहे की, निअँडरतालच्या डीएन्एचा पुरेसा अभ्यास झालेला नाही. पण जो काही अभ्यास झाला आहे त्यावरून असे दिसून आले आहे की, आधुनिक मनुष्याला भाषा हे कौशल्य ज्या प्रकारच्या 'जीन'मुळे प्राप्त झाले आहे तोच 'जीन' निअँडरतालच्या डीएन्ए मध्येही आहे.

(४)

आपण पाहिले की, हवामानातील हेलकावे व हिमयुग यांच्यामुळे निअँडरताल संपले असा जो विचार होता त्याला पुरेसे पाठबळ मिळत नाही. मनुष्य व निअँडरताल यांच्यात अन्नासाठी चढाओढ लागली व तीत निअँडरताल हरले व नाश पावले हा युक्तिवादही मान्य होण्याजोगा नाही. कारण मनुष्य व निअँडरताल यांच्यातील भेद पुसट होता. त्यामुळे आता काही शास्त्रज्ञ असा विचार मांडत आहेत की, मनुष्य व निअँडरताल यांच्या संस्कृतीत व शरीरधर्मात (बायॉलॉजी) जे काही सूक्ष्म भेद असतील त्यातूनच निअँडरताल का नष्ट झाले व मनुष्य का तगला, याचा विचार केला पाहिजे. जेव्हा जीवनकलह अतिशय तीव्र होतो तेव्हा ज्या पक्षाकडे थोडकासा का होईना सरसपणा (अड्व्हान्टेज) असतो तो पक्ष स्पर्धकाला नेस्तनाबाबूत करू शकतो. उदा. तत्कालीन मनुष्यवस्तीचे जे अवशेष आहेत त्यात सुया आढळल्या आहेत; तर निअँडरतालला सुई माहीत नव्हती. साहजिकच मनुष्य कातड्याचे कपडे व तंबू तयार करून थंडीचा (निअँडरतालापेक्षा) जास्त चांगला मुकबला करू शकला असावा. तसेच माणसाचे भक्ष्य विविध प्रकारचे- किडे, सरपटणारे प्राणी, शेंगा व फळे इ. – असल्याने मनुष्यसमूहात श्रमविभाग करता येत असे. स्त्रियांकडे फळे, शेंगा, कंदमुळे गोळा करण्याचे काम सोपवून पुरुष मोठ्या जनावरांची शिकार करण्याला मोकळे राहात. निअँडरतालांची सवय मोठ्या सस्तन प्राण्यांची शिकार करणे ही होती. त्यांच्या शिकारीमध्ये स्त्रिया व मुले हाकाऱ्याचे काम करून सावजांना पुरुषांच्या दिशेने हाकलत नेत. सारांश, मनुष्यातील स्त्रिया व मुले हलक्या श्रमाचे काम करीत व त्यांचा प्रतिपाळ पुरुष करीत. निअँडरतालांमध्ये श्रमविभाग नसल्याने स्त्रिया व मुले यांना उसंत नसे. याच अनुषंगाने हेही लक्षात घेतले पाहिजे की, निअँडरतालांची पचनसंस्था अशी होती की, त्यांना खावयाला भरपूर अन्न लागे. मनुष्यापेक्षा निअँडरतालला खूपच जास्त कॅलरी मिळतील इतके अन्न खाण्याची इच्छा असे. मनुष्याच्या चालण्यात जेवढी शक्ती खर्च होई त्याच्या पेक्षा ३२% जास्त शक्ती निअँडरतालला तेवढेच अंतर चालण्याला लागे, असा शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. परिणाम असा झाला की, मनुष्याला मुलांची व पैदास वाढविण्यासाठी आणि त्यांचे संगोपन करण्यासाठी जास्त ताकद खर्च करता येत असे.

सुमारे ३०,००० वर्षांपूर्वी मनुष्याच्या आयुर्मानात फरक पडला. माणसे जास्त जगू लागली. आपली नातवंडे ज्यांनी पाहिली आहेत अशा माणसांची संख्या वाढली. मनुष्याच्या आयुष्यात ही जी वाढ झाली ती कशामुळे ह्याचा शोध अजूनही लागलेला नाही. पण याचे दोन परिणाम झाले. पहिला असा की, जास्त वर्षे जगल्याने आणखी मुले प्रत्येक जण जन्माला घालू लागला व

माणसांची संख्या झपाट्याने वाढू लागली. दुसरे असे की, माहिती, कौशल्य किंवा ज्ञान संपादन करण्यास व पुढील पिढीपर्यंत ते पोचविण्यास माणसांना अधिक वेळ मिळू लागला. समजा की, अगदी अवर्षणाच्या वर्षीसुद्धा कुठल्या तळ्यात किंवा डोहात पाणी हटकून मिळतेच; ही माहिती असलेला माणूस आयुर्मर्यादा वाढल्यामुळे बालबच्याना सांगू शकू लागला. टोळ्यातील वृद्धांची व आनुभविक माणसांची संस्था वाढल्याने टोळ्यांची संघटना अधिक शिस्तवार होऊ लागली. माहितीच्या साठ्याचे जतन व वर्धन होऊ शकले. या उलट निॲंडरतालांच्या आयुष्यमानात काहीच फरक पडला नाही. त्यामुळे, कदाचित, त्यांचा ज्ञानसाठा विसरला जाऊ लागला.

निॲंडरतालांच्या मृत्यूची ही अश्मयुगीन रहस्यकथा अजूनही समाधानकारक उलगडा होऊन संपलेली नाही. पण संशोधकांचा असा निष्कर्ष आहे. निॲंडरतालांच्या सर्वच कळपांचा शेवट एकविध कारणाने झाला असेल, असे नाही. हवामानातील बदल, मनुष्याशी चढाओढ, माणसाच्या ठिकाणी असणारे अनुकूल गुणधर्म यातील एक किंवा अधिक कारणे निरनिराळ्या प्रमाणात निरनिराळ्या टोळ्यांच्या समाप्तीला साधनभूत झाली असतील. काही टोळ्या साथीच्या रोगांनीही दगावल्या असतील. काही लहान टोळ्यांचा अंतर्जननामुळे (इनब्रीडिंग) ऱ्हास झाला असेल. दर वस्तीची काही निराळीच कहाणी असेल.

निॲंडरतालांची अखेरची वस्ती जिब्राल्टर बेटाच्या समुद्र किनाऱ्यावरील गुहातून होती. ही वस्ती २८ हजार वर्षापूर्वीपर्यंत होती, हे वर नमूद केलेच आहे. या वस्तीला मनुष्यापासून काही उपसर्ग पोचला नाही हेही स्पष्ट आहे. अशा परिस्थितीत त्यांचा शेवट कसा झाला याचा उलगडा अजून व्हावयाचा आहे.

अशी ही आपल्या दूरच्या नातलगाची कथा आहे.

**संदर्भ :** सायंटिफिक अमेरिकन ऑगस्ट २००९.



# परीक्षण लेख : विधिमंडळे आणि न्यायसंस्था : संघर्षाचे सहजीवन

प्रा. सीताराम रायकर

(विधिमंडळे आणि न्यायसंस्था: संघर्षाचे सहजीवन लेखक न्या. नरेंद्र चपळगावकर, मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती : २००८; पृष्ठे : ७४; किंमत रू.७०.)

या छोट्याशा पुस्तिकेमध्ये मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायमूर्ती नरेंद्र चपळगावकर यांनी नागरी समाजाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या विषयाची अतिशय सुबोध मांडणी केली आहे. या पुस्तिकेच्या प्रस्तावनेत न्यायमूर्ती चंद्रशेखर धर्माधिकारी यांनी म्हटल्याप्रमाणे, न्या. चपळगावकर हे एक व्यासंगी व्यक्तिमत्त्व आहे त्यांच्या अभ्यासविषयांचे क्षेत्रही व्यापक आहे. त्याबरोबर त्यांच्या खास व्यासंगाच्या विषयांवर अतिशय सुभग, प्रवाही भाषेत लिहिण्याचे कसबही त्यांना साध्य आहे. त्यांचे लेखन, मग ते ललित लेखन असो वा गंभीर विषयांचे विश्लेषण करणारे असो, नेहमीच लालित्यपूर्ण् शैलीत लिहिलेले असते. न्या. चपळगावकर प्रथितयश वकील होते आणि उच्च न्यायालयात त्यांनी प्रथम वकील म्हणून व नंतर न्यायाधीश म्हणून अनेक वर्षे काम केले, साहजिकच न्यायसंस्थेविषयीचे आणि नागरी समाजाच्या स्वास्थ्याच्या दृष्टीने ती निकोप असणे किती महत्त्वाचे आहे या विषयीचे त्यांचे आकलन नेमके आहे. या त्यांच्या आकलनाला सहाय्यभूत असणारी आणखी एक बाजू न्या. चपळगावकरांच्या व्यक्तिमत्त्वाला आहे. लहानपणापासून त्यांचे राजकारण आणि समाजकारणाशी संबंध होते. न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे न्या. चपळगावकरांचे वडील स्वातंत्र्य चळवळीतील बिनीचे शिलेदार होते. त्यांच्यामुळे न्या.चपळगावकरांचा सामाजिक राजकीय चळवळींशी जवळून संबंध आला. आपल्या मनोगतात ते म्हणतात, वकील आणि न्यायाधीश म्हणून काम करताना न्यायसंस्था आणि विधिमंडळे यांच्या कार्यकक्षा आणि परस्परसंबंध यांचा विचार करण्याचे प्रसंग आले. असा विचार कधीकधी केवळ तांत्रिक बाजूंचा करणारा आणि घटापटाची शुष्क चर्चा करणारा होऊ शकतो. न्या. चपळगावकरांचा राजकीय सामाजिक घडामोडींशी असलेला संबंध, त्या घटनांकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण आणि महाराष्ट्रातील समाजवादी चळवळीशी संबंध असल्यामुळे काही निश्चित मूल्यात्मक विचारसरणीचे त्यांच्यावर झालेला संस्कार या सगळयांमुळे त्यांना न्यायसंस्था – विधिमंडळ यांच्या साहचर्य--संघर्षात्मक नात्याकडे एका व्यापक दृष्टिने पाहण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले. कायदा, न्यायव्यवस्था, घटना, विधिमंडळे या सगळ्या संस्था शेवटी कोणासाठी आहेत? या कळीच्या प्रश्नाचे त्यांचे भान पक्के आहे. सरतेशेवटी या संस्थांशी अंकित असलेल्या सर्वसामान्य नागरिकाला निर्भय, आणि निरामय जीवन जगता यावे यांसाठी या सगळ्या संस्था आहेत. घटनात्मक संस्थांकडे केवळ पुस्तकी अंगाने विचार न करता त्यांचे प्रत्यक्ष कामकाज व व्यवहारातील स्वरूप मला लक्षात घ्यावेसे वाटले व राज्याचे अंतिम उद्दिष्ट म्हणजे सामान्य माणसाचे कल्याण व त्याच्या अधिकारांचे रक्षण. ते साध्य करण्यासाठी या संस्था आपली कामगिरी कशी बजावतात हे पाहावेसे वाटले. ही दृष्टी त्यांना त्यांच्या लोकशाही समाजवादी चळवळीत भाग घेतल्यामुळे मिळाल्याचे त्यांनी नमूद केले आहे.

न्यायसंस्था आणि विधिमंडळ या दोन संस्था घटनेने निर्माण केलेल्या संस्था आहेत. सामान्य माणसाचे– नागरिकाचे हक्क आणि अधिकार यांचे रक्षण करणे आणि त्याचे कल्याण साधेल अशी परिस्थिती निर्माण करणे ही उद्दिष्टे या दोन संस्थाद्वारे साधली जातात. साहजिकच त्यांच्यामध्ये परस्परांविषयी योग्य तो आदरभाव असला पाहिजे आणि साहचर्यही असले पाहिजे. असे असले तरी या दोन संस्थांची कार्यक्षेत्रे आणि अधिकारक्षेत्रे अशी आहेत की त्यांच्यामध्ये मतभेद, विरोध किंवा संघर्षही निर्माण होणे अपरिहार्य आहे. घटनेनेच विधि-मंडळ,न्यायसंस्था आणि कार्यपालिका यांच्या कार्यकक्षा

स्पष्ट केलेल्या असल्या तरी त्या कक्षा सर्वकाळ, अपरिवर्तनीय आणि काटेकोर असतील अशा स्वरूपाची मर्यादा रेखा आखणे अशक्य आहे. न्या. चपळगावकर यांना याची पुरेपूर जाणिव आहे. आणि म्हणूनच अशा वेळी संयम आणि विवेक यांचा आश्रय करावा लागतो अशी सामंजस्याची भूमिका ते घेतात.

पहिल्या प्रकरणात न्या. चपळगावकर यांनी आधुनिक राज्यशास्त्रात मांडण्यात आलेल्या विधिमंडळे, न्यायपालिका आणि कार्यपालिका या तीन अंगांच्या स्वरूपाचे विवेचन केलेले आहे. जर या तीन संस्था आपआपल्या अधिकार क्षेत्रात राहून इतर दोन संस्था वर आक्रमण करणे टाळतील तर त्या नागरिकांचे कल्याण साधण्यात यशस्वी होतील. गेल्या पन्नास साठ वर्षात या तीन संस्थात ताणतणाव, मतभेद, नक्कीच निर्माण झाले. पण समंजसपणाचे पथ्यही पाळले गेले आणि अगदी टोकाचे, आता माघार नाही अशी अटीतटीची भूमिका टाळण्यातही आपण यशस्वी झालो. पण आता मात्र या संस्था पुन्हा एकदा परस्परांच्या अधिकारक्षेत्रांना आव्हान देण्याच्या पवित्र्यात दिसत असल्यामुळे या पुस्तिकेची प्रस्तुतता अधिक स्पष्टपणे जाणवते.

विधिमंडळे आणि न्यायपालिका या दोन्ही संस्था इंग्रजांमुळे या देशात आल्या. भारतातील प्राचीन किंवा मध्ययुगीन काळात अस्तित्वात असलेल्या संस्थापेक्षा त्या गुणात्मकदृष्ट्या निराळ्या आहेत. न्या. चपळगावकरांनी या इंग्रजांकडून मिळालेल्या देणग्या इथे कशा स्थिरावल्या, रुजल्या हे थोडक्यात पहिल्या प्रकरणात सांगितले आहे त्यात काही तपशीलांबाबत मतभेद असले तरी न्यायालयाचे स्वातंत्र्य ही संकल्पना भारतात प्रथम कार्यपालिकेच्या प्रभावापासून त्यांना दूर राखण्याच्या गरजेतून...... निर्माण झाली आहे हे त्यांनी चांगल्याप्रकरे स्पष्ट केले आहे. न्यायपालिका आणि विधिमंडळ यांच्या कामाविषयी व उद्दिष्टांविषयीचे विवेचनही सुबोध आहे. कायद्याची वैधता हा सर्वसामान्य वाचकाच्या दृष्टीने महत्त्वाचा मुद्दा. त्याचे सोपे सुटसुटीत उत्तर पान ७ व ८ वर मिळते. घटना आणि राजकारण यात संघर्ष कुठे निर्माण झाला हेही न्या. चपळगावकरांनी व्यवस्थित मांडले आहे. न्यायपालिकेचे राजकारण्यांचे निर्णय रद्द करण्याचे काम अप्रिय आहे पण ते करावे लागते कारण ते घटनादत्त कर्तव्य आहे या त्यांच्या विधानामुळे त्यांची स्वतःची भूमिका स्पष्ट होते.

घटना अंमलात आली, कार्यान्वित झाली आणि घटनात्मक अडचणी व्हायला सुरूवात झाली असे होणे अपरिहार्य होते. आणि अडचणी, दूर करण्यासाठी पेचप्रसंग सोडवण्यासाठी घटनेचे पुनरावलोकन आणि आवश्यक तेथे दुरूस्ती या प्रक्रियांना सुरूवात झाली आणि एकप्रकारे घटना आणि विधिमंडळ यांच्यातील ताणतणावांना सुरूवात झाली. आदर्शवादी घटना आणि आणि गुंतागुंतींचे वास्तव यांतून हे तणाव निर्माण झाले होते. अभिव्यक्तिस्वातंत्र्य संचारस्वातंत्र्य, जमीनसुधारणा, जमीनदारी नष्ट करणे दुबळ्या घटकांना मदत करण्यासाठी सकारात्मक भेदभावांची (पॉझिटिव्ह डिस-क्रिमिनेशन) गरज या मुद्द्यांतून पहिली घटना दुरूस्ती अस्तित्वात आली. या विषयी विस्तृत विवेचन न्या. चपळगावकर करतात. या नंतरच्या प्रकरणात गोलक-नाथचा निर्णय आणि नाथ पैंचे विधेयक आणि त्यामुळे निर्माण झालेल्या मूलभूत हक्कविषयक कायद्यात बदल करण्यात संसदेच्या अधिकारांबाबत बॅ. नाथ पै यांनी एक विधेयक मांडले. त्यामुळे संसद श्रेष्ठ की घटना (पर्यायाने न्यायालय) श्रेष्ठ या वादाला तोंड फुटले. या अतिशय महत्त्वाच्या टप्प्याचे न्या. चपळगाकरांनी थोडक्यात पण अतिशय सुबोध शैलीत विवरण केले आहे—विशेषतः या बिलाच्या बाजूने आणि विरूद्ध अशी मते व्यक्त करण्यात आली होती ती उद्धृत केल्याने या प्रश्नाची सांगोपांग चर्चा तेथे उपलब्ध होते.

विधिमंडळ आणि न्यायपालिका यातील तणाव दाखवणाऱ्या घटना दुरुस्त्या एकप्रकारे देशात चाललेल्या आर्थिक, राजकीय आणि सामाजिक स्थित्यंतराच्या द्योतक आहेत. बँकांचे राष्ट्रीयकरण, संस्थानिकांचे तनखे रद्द करण्याचा प्रस्ताव तसेच संसद आणि न्यायालय यांच्या अधिकार क्षेत्राबद्दल नव्या सीमारेषा आखल्या त्या केशवानंद भारती खटला या सर्वांतून स्वातंत्र्य प्राप्तीनंतर राष्ट्ररूप धारण केलेल्या समाजाच्या वाढत्या

आकांक्षा यांचे दर्शन होतेच आणि राष्ट्राच्या सार्वभौमत्वाचे स्वरूप काय याचेही नेटके दर्शन होते. त्याच वेळी १९७० नंतर नेहरू युगाचा प्रसार ओसरून नव्या, असहिष्णु वृत्तीचा आढळ होऊ लागतो. विशेषतः इंदिरा गांधीनी लादलेल्या आणीबाणीच्या काळात घेतल्या गेलेल्या पवित्र्यांवरून हे दिसून येते. यादृष्टीने 'बेचाळिसावी घटना दुरूस्ती' हे प्रकरण आणि विशेषतः डॉ. अंतुले यांचे वक्तव्य आणि 'कमिटेड ज्युडिशिअरी' या कल्पनेचे विवेचन फार मोलाचे आहे. आणि नागरी समाजाविषयी आस्था असणाऱ्या वाचकांनी ते मुळातूनच वाचले पाहिजे.

विधिमंडळांचे विशेषाधिकार हाही न्यायसंस्था आणि विधिमंडळ यांच्यातील ताणतणावाचा एक महत्त्वाचा मुद्दा राहिलेला आहे. विधिमंडळ सदस्य आणि न्यायाधीश या दोघांनाही आपली कर्तव्ये निर्भयपणे आणि निर्भिडपणे पार पाडता येणे अतिशय महत्त्वाचे आहे. पण इथेही परस्परांच्या अधिकार कक्षांबाबत मतभेद होऊन या दोन संस्थांत तणाव निर्माण झालेले आहेत. यात गुंतलेले कायदेशीर मुद्दे न्या. चपळगावकरांनी विशद करून दोन्ही पक्षांना न्याय देईल अशी मांडणी केली आहे. त्यावरूनही त्यांची भूमिका सामंजस्याची आहे असे दिसते.

न्यायपालिका आणि विधिमंडळ यांनी परस्परांविषयी आदर बाळगला पाहिजे याचे प्रत्यंतर पक्षांतरबंदी या प्रकरणात दिसते. जगजितसिंग वि. हरियाना राज्य या खटल्याच्या निकालात नमूद केलेली मार्गदर्शक तत्त्वे या सामंजस्याची द्योतकच आहेत.

१९५० ते २००० या पन्नास वर्षांच्या काळात भारतीय राज्यघटनेचा प्रवास कसा झाला, घटनेने निर्माण केलेल्या न्यायपालिका, विधिमंडळ आणि कार्यपालिका यांचे परस्परसंबंध कसे राहिले याचे विवेचन केल्यानंतर न्या. चपळगावकर यांनी शेवटच्या 'आत्मसंयमन व परस्पराबद्दल आदर' या प्रकरणात मौलिक उपसंहार केलेला आहे. 'न्यायालयाचे इच्छाधिकार', 'कायद्याच्या वैधतेचे निकष' यातूनही ते सामंजस्याचीच बाजू मांडतात. पृष्ठ ६७ वरील राज्यघटनेवरचे त्यांचे भाष्य मुळातूनच वाचले पाहिजे. या समारोपाच्या शेवटी "आपल्या अधिकारांचे, स्वातंत्र्याचे, आकांक्षांचे महत्त्व खुद्द लोकांच्या मनात किती जागृत आहे, त्यासाठी ते किती आग्रही आहेत हेच महत्त्वाचे आहे" असे प्रतिपादन न्या. चपळगावकर करतात. न्या. लर्नेड हँड म्हणाले होते की घटना आणि तिच्याद्वारा निर्माण झालेल्या विधिमंडळ किंवा कार्यपालिका या संस्थांचे बळ, लोकांच्या मनात स्वातंत्र्याविषयीचे प्रेम किती तीव्र आहे यावर अवलंबून आहे. स्वातंत्र्य प्रेम तीव्र असेल तर घटना आणि घटनात्मक संस्था सशक्त आणि कल्याणकारी असतील पण लोकांच्या मनातील स्वातंत्र्येच्छा जर दुबळी झाली तर मग घटना, विधिमंडळ, कार्यपालिका या संस्था केवळ शुष्क सांगाडे या रूपाने शिल्लक राहतील.

न्या. चपळगावकरांनी या प्रश्नाची केलेली मांडणी सर्वसामान्य वाचकांसाठी आहे. ती सुबोध आहे तशीच उद्‌बोधकही आहे. आणखी एक वैशिष्ट्य जाणवते या पुस्तिकेत घटनेच्या वाटचालीचा ५०-६० वर्षांचा मागोवा घेतला आहे पण तो किचकट कायदेशीर भाषेत नव्हे तर लालित्यपूर्ण भाषेत. या वाटचालीत सहभागी झालेल्या प्रमुख नेत्यांचे दर्शनही जाता जाता होते. पंडित नेहरूंचा आदर्शवाद, न्यायालयांबाबत संयत, आदरपूर्ण भूमिका आदर्शवादाला भक्कमपणे पण सौहार्दपूर्ण भाषेत जमिनीवर उतरवणारे सरदार पटेल आणि 'स्वार्थापेक्षा लोकहित महत्त्वाचे' वाटले पाहिजे असे बजावणारे डॉ. राजेंद्रप्रसाद. घटना निर्मितीच्या काळात नव्या राष्ट्राच्या उभारणीच्या कल्पनेने भारलेल्या भारताचे दर्शनच आपल्याला होते. आणि आजचे चित्रही डोळ्यापुढे येऊन खेद वाटतो.



## साभार पोच

१) *मराठी कथा रूप आणि परिसर* : प्रा. म. द. हातकणंगलेकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६, शनिवार पेठ, पुणे; द्वितीयावृत्ती – २००८; पृष्ठे – १५४; रू. १५०/–.

२) *साहित्यातील अधोरेखिते* : प्रा. म. द. हातकणंगलेकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६, शनिवार पेठ, पुणे; द्वितीयावृत्ती – २००८; पृष्ठे – २१८; रू. १५०/–.

३) *बिनकाट्यांचे झाड* : अनुराधा चिन्मुळगुंद; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६, शनिवार पेठ, पुणे; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – १६९; रू. १५०/–.

४) *वाङ्मयीन शैली आणि तंत्र* : प्रा. म. द. हातकणंगलेकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६, शनिवार पेठ, पुणे; द्वितीयावृत्ती – २००८; पृष्ठे – २२७; रू. १५०/–.

५) *एकम्* : मिलिंद बोकिल; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ७४; रू. ७०/–.

६) *बॉम्बस्फोटानंतर ..... मालेगाव* – निळू दामले; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – १४४; रू. १२०/–.

७) *क्रीडागाथा* : नन्दू नाटेकर; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – २४०; रू. २००/–.

८) *रमजानची उपासना आणि भारतीय संस्कृती* : अनीस चिश्ती; मावळाई प्रकाशन, २३३४, एस. टी. स्टॅण्डसमोर, मु. पो. ता. शिरूर, जि. पुणे; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – १८१; रू. १६०/–.

९) *गांधी-आंबेडकर अस्पृश्यमुक्ती संघर्ष* : श्रीराम निकम; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – २३२; रू. २२५/–.

१०) *महाराष्ट्रीय संतमंडळाचे ऐतिहासिक कार्य* : बा. रं. सुंठणकर; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; तिसरी आवृत्ती – २००८; पृष्ठे – १७९; रू. १७५/–.

११) *पेटंटशाही आणि आपण* : सुनीती धारवाडकर; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १७६; रू. १५०/–.

१२) *मराठा ओबीसीकरण* : प्रा. अशोक बुद्धावंत; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ३१२; रू. १००/–.

१३) *सामाजिक परिवर्तन : चिकित्सा आणि भवितव्य* : शरद जावडेकर/वसुधा जोशी/लता जाधव/रविंद्र म्हसदे; सुगावा प्रकाशन, ५६२ सदाशिव पेठ, पुणे; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ३८२; रू. ३००/–.

१४) *सोळा भाषणे* : भालचंद्र नेमाडे; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २३१; रू.२२५/-.

१५) *आठा उत्तराची कहाणी* : ग. प्र. प्रधान; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती- - २००९; पृष्ठे – १७८; रू. १७५/–.

१६) *इमारत* : फिरोझ रानडे; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १२४; रू. १२०/–.

१७) *विधीमंडळे आणि न्यायसंस्था* : नरेंद्र चपळगांवकर; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ७४; रू. ७०/–.

१८) *निंबोणीच्या झाडामागे* : मंगेश पाडगांवकर; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – १९५६, चौथी आवृत्ती : २००९; पृष्ठे – ११७;

अनुक्रमणिका

रू. १००/-.

१९) *शब्द* : मंगेश पाडगांवकर; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ८७; रू. ७०/-.

२०) *अखेरचे झोपडे* : अनुवादक वसंत केशव पाटील; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ८६; रू. ७५/-.

२१) *'सोनाटा' आणि 'एका नटाचा मृत्यू'* : महेश एलकुंचवार; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ६३; रू. ७०/-.

२२) *प्लीऽऽज!* : गुरुनाथ सामंत; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ८८; रू. ७०/-.

२३) *आरपार लयीत प्राणांतिक* : प्रज्ञा दया पवार; लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ५५; रू. ६०/-.

२४) *विसकट* : धम्मपाल रत्नाकर; लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २५३; रू. २५०/-.

२५) *तप्त प्रवाह* : प्रदीप कर्णिक/चंद्रकांत भोंजाळ; लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १८७; रू. २२५/-.

२६) *लाल चिखल* : इंद्रजित भालेराव; लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २०९; रू. २२५/-.

२७) *चौकटीबाहेरचे चिंतन* : किशोर बेडकिहाळ; लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २२५; रू. २२५/-.

## लेखकांचा परिचय

❋ **प्रा. रत्नाकर बापूराव मंचरकर**
मराठीचे सेवानिवृत्त अध्यापक, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, साहित्य, शिक्षण आणि समाज यांवर वैविध्यपूर्ण लेखन, संपादन व शोध निबंध, लेखनाबद्दल राज्य पुरस्काराने सन्मानित.
***पत्ता :*** श्री स्वामी समर्थ, १९, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर - ४१४ ००३.

❋ **प्रा. विठ्ठल दहिफळे**
प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग वरिष्ठ, पीपल्स कॉलेज, नांदेड. साधना मासिक व दै. लोकमत यामध्ये लेख प्रकाशित.
***पत्ता :*** पीपल्स कॉलेज, नांदेड (मराठवाडा).

❋ **प्रा. डॉ. अरुण कृष्णा शिंदे**
मराठी विभाग प्रमुख, द. मि. कदम गुरुजी सायन्स कॉलेज, मंगळवेढा.
***पत्ता :*** द. मि. कदम गुरुजी सायन्स कॉलेज, मंगळवेढा, जि. सोलापूर – ४१३ ३०५.

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊ न आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ् मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

- संपादक मंडळ

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के 'सागर ग्राफिक्स अ‍ॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका